प्रकाशक
रघुनाथ गणेश जोशी,
सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या
विश्वस्त मंडळाकरितां.
१२ टिळक रोड, पुणें २

CHECKED 1955
CHECKED 1959
By SL. & L.
Checked 1965

संपादक
आचार्य शं. द. जावडेकर
आचार्य स. ज. भागवत

Checked 1969

मुद्रक
दामोदर नरहर शिखरे, एम्. ए.
'अग्रणी मुद्रणालय'
६२३।२६ सदाशिव, पुणें २

# अनुक्रम

| विषय | पृष्ठ |
| --- | --- |
| १ ब्रह्मचर्य ... ... ... | १ |
| २ गृहस्थाश्रमाच्या प्रवेशद्वारांत ... ... | ४ |
| ३ विवाहितांचें ब्रह्मचर्य ... ... | १० |
| ४-एक नैतिक पेंच ... ... | १४ |
| ५ विवाहाचा आदर्श ... ... | १६ |
| ६ एका तरुणाची शंका ... ... | २१ |
| ७ जनक नसलेला पिता ... ... | २४ |
| ८ त्याचें कारण ... ... | २६ |
| ९ खरें असेल तर कौतुकास्पद ... ... | २९ |
| १० स्वैरसंबंधाकडे धांव ... ... | ३२ |
| ११ एक त्याग ... ... ... | ३७ |
| १२ ईश्वरी कृपेवांचून कांहीं नाहीं ... ... | ४० |
| १३ अहिंसा कशी काम करते? ... ... | ४४ |
| १४ संतति-नियमन (१) ... ... | ५१ |
| १५ संतति-नियमन (२) ... ... | ५५ |
| १६ संयम-धर्म ... ... ... | ५८ |
| १७ संयमाच्या द्वारा संततिनियमन ... ... | ६३ |
| १८ एका तरुणापुढलि प्रश्न ... ... | ६६ |
| १९ अमेरिकेंतील एक साक्षीदार ... ... | ६८ |
| २० मिसेस् सँगर आणि गांधीजी ... ... | ७० |
| २१ गर्भनिरोधनाच्या कृत्रिम साधनांसंबंधीं ... | ७६ |

२२ 'अरण्य-रुदन' ... ... ... ८३
२३ संतति-नियमनाचा प्रश्न ... ... ८७
२४ एक उत्साही संततिनियमन–प्रचारिका ... ९०
२५ स्त्री–सुधारकांना ... ... ... ९५
२६ तरुण मंडळींना ... ... ... १०१
२७ विकृत कामप्रवृत्ति ... ... ... १०५
२८ एक वाढतें दुष्ट व्यसन ... ... १०८
२९ सुधारकांचें कर्तव्य ... ... ... ११०
३० कृत्रिम संतति-नियमन म्हणजे— ... ... ११३
३१ विद्यार्थ्यांना काळिमा ... ... ११५
३२ आधुनिक तरुणी ... ... ... १२२
३३ कामशास्त्राचें शिक्षण ... ... १२६
३४ अयोग्य नारीपूजन ... ... १३१
३५ अश्लील जाहिराती ... ... १३४
३६ अश्लील जाहिराती कशा थांबवाव्यात ? ... १३७



# ब्रह्मचर्य : : : : १

आपल्या व्रतांपैकीं तिसरें व्रत ब्रह्मचर्य हें आहे. वास्तविक पाहातां इतर सर्व व्रतें एका सत्याच्या व्रतामधूनच उत्पन्न होतात आणि त्याच्या-साठींच त्यांचें अस्तित्व आहे. ज्या मनुष्याचें सत्याशीं लग्न लागलें आहे, जो त्याचीच उपासना करतो, तो दुसऱ्या कोणत्याहि वस्तूची आराधना करील तर व्यभिचारी ठरेल. मग विकारांची आराधना कोठची? ज्याची प्रत्येक हालचाल सत्याच्या दर्शनाप्रीत्यर्थच चालली आहे तो प्रजोत्पत्ति-कार्यांत किंवा गृहसंसारांत पडूं शकेल तरी कसा? भोगविलासांनीं कोणाला सत्य सांपडल्याचें आजवर आपल्यापाशीं एकहि उदा-हरण नाहीं.

किंवा अहिंसेचें पालन घेतलें, तरी तिचें पूर्ण पालन ब्रह्मचर्यावांचून अशक्य आहे. अहिंसा म्हणजे सर्वव्यापी प्रेम. जेथें पुरुषानें एका स्त्रीला किंवा स्त्रीनें एका पुरुषाला आपलें प्रेम अर्पण केलें तेथें त्याच्यापाशीं वा तिच्यापाशीं दुसऱ्याला देण्यासाठीं काय राहिलें? 'आम्ही दोघे आधीं, बाकी सारे मागाहून' असाच त्याचा अर्थ झाला. पतिव्रता स्त्री आपल्या पतीसाठीं आणि पत्नीव्रत पुरुष आपल्या बायकोसाठीं सर्वस्वाचा होम करण्याला तयार होईल. अर्थात् त्यांच्याकडून सर्वव्यापी प्रेमाचें पालन होऊंच शकणार नाहीं हें उघडच आहे. 'हें विश्वाचि माझें घर' अशी वृत्ति त्यांना बनवितांच येणार नाहीं. कारण, त्यांच्याजवळ 'आपलें' म्हणून मानलेलें एक कुटुंब अगोदरच आहे किंवा तसें तयार होऊं घातलें आहे. या कुटुंबाची जितकी वृद्धि होईल तितका सर्वव्यापी प्रेमांत विक्षेप येणार. साऱ्या जगांत हेंच चाललेलें आपण पहात आहों. म्हणून अहिंसाव्रताचें पालन करणाऱ्याला विवाह करून भागणार नाहीं; मग विवाहबाह्य विकारांबद्दल तर विचारावयासच नको.

मग ज्यांचा विवाह अगोदरच झाला आहे त्यांचें काय? त्यांना सत्य कधीं सांपडावयाचेंच नाहीं काय? त्यांना कधींहि सर्वार्पण करतां येणार नाहीं काय? आपण त्यासाठीं मार्ग काढलाच आहे; तो म्हणजे विवाहितानें अविवाहिताप्रमाणें राहावयाचें. या दिशेनें याच्यासारखा सुंदर उपाय मी दुसरा कोणताहि अनुभवलेला नाहीं. या स्थितीची गोडी ज्यानें चाखली तोच हिच्याविषयीं ग्वाही देऊं शकेल. आज या प्रयोगाची यशस्विता सिद्धच झाली आहे असें म्हणतां येईल. विवाहित स्त्री-पुरुष परस्परांना भाऊबहीण मानूं लागले कीं सर्व जंजाळांतून ते मुक्त होतात. जगांतील स्त्री तेवढी आपली बहिण, आई, मुलगी आहे हा विचारच माणसाला एकदम उंचावर नेणारा आहे, बंधनांतून मुक्ति देणारा आहे.

यांत पतिपत्नींचें कांहीं नुकसान होत नाहीं. उलट आपल्या पुंजींत तीं वृद्धीच करतात, त्यायोगें तीं कुटुंब वाढवितात, विकाररूपीं घाण काढून टाकल्यानें प्रेमसुद्धां वृद्धिंगत करतात. विकार गेल्यानें परस्परांची सेवा अधिक चांगल्या प्रकारें होऊं शकते, परस्परांमधील भांडणतंट्यांचे प्रसंग कमी होतात. जेथें स्वार्थी, एकांगी प्रेम आहे तेथेंच झगड्याला अधिक स्थान असतें.

वरील प्रधान विचार केल्यानंतर आणि तो हृदयांत ठसल्यानंतर ब्रह्मचर्यामुळें मिळणारें शारीरिक लाभ, वीर्य—लाभ वगैरे लाभ गौण ठरतात. जाणुनबुजून भोगविलासाकरितां वीर्यहानि करणें आणि शरीर निःसत्त्व करून टाकणें हा केवढा बरें मूर्खपणा! वीर्याचा उपयोग उभयतांची शारीरिक आणि मानसिक शक्ति वाढविण्याकरितां आहे. त्याचा विषयभोगाकरितां उपयोग करणें हा त्याचा पराकाष्ठेचा दुरुपयोग आहे, आणि त्यामुळें मनुष्य अनेक रोगांचें मूळ होऊन बसतो.

अशा तऱ्हेचें ब्रह्मचर्य मन, वचन आणि काया यांहीकरून पाळावयाचें असतें. व्रत म्हणून जेवढें आहे त्याविषयीं असेंच समजावें. जो

शरीर ताब्यांत ठेवीत असलेला दिसतो पण मनानें विकारांचें पोषण करीत असतो तो मूढ मिथ्याचारी होय असें गीतेंत आपण वाचलें आहे; सर्वांनीं त्याचा अनुभव घेतलेला असतो. मनाला विकारी होऊं द्यावयाचें आणि शरीराला दाबण्याचा प्रयत्न करावयाचा यांत नुकसानच आहे. जिकडे मन आहे तिकडे शेवटीं शरीर ओढल्यावांचून राहाणारच नाहीं. येथें एक भेद समजून घेणें अवश्य आहे. मनाला विकारवश होऊं देणें हें वेगळें आणि मन आपोआप, अनिच्छेनें, बलात्कारानें विकारी होणें किंवा होत राहाणें हें वेगळें. या विकारांत आपण साहाय्यभूत झालों नाहीं म्हणजे शेवटीं आपलाच जय आहे.

शरीर ताब्यांत राहातें, पण मन राहात नाहीं असा आपल्याला क्षणोक्षणीं अनुभव येतो. म्हणून शरीराला लगेच ताब्यांत घेऊन मनाला ताब्यांत ठेवण्याचा नित्य प्रयत्न आपण केला म्हणजे आपण आपलें कर्तव्य पार पाडलें. मनाच्या आपण आधीन झालों कीं शरीराचा आणि मनाचा विरोध सुरू झाला, मिथ्याचाराला आरंभ झाला. मनोविकार आपण दाबीतच राहूं तोंवर दोन्ही एकमेकांबरोबर जात आहेत असें म्हणतां येईल.

या ब्रह्मचर्याचें पालन फार कठीण, जवळजवळ अशक्य समजलें गेलें आहे. त्याचीं कारणें शोधतांना ब्रह्मचर्याचा संकुचित अर्थ करण्यांत् येतो असें आढळून येतें. जननेंद्रियविकाराचा निरोध म्हणजेच ब्रह्मचर्याचें पालन असें समजलें जातें. ही व्याख्या अपुरी आणि चुकीची आहे असें मला वाटतें. विषयमात्राचा निरोध हेंच ब्रह्मचर्य होय. इतर इंद्रियांना इतस्ततः भटक्या मारूं देऊन जो एकाच इंद्रियाला अटकाविण्याचा प्रयत्न करतो तो निष्फळ प्रयत्न करतो यांत काय शंका? कानांनीं विकारी गोष्टी ऐकावयाच्या, डोळ्यांनीं विकार उत्पन्न करणाऱ्या गोष्टी पहावयाच्या, जिभेनें विकारोत्तेजक वस्तूंचा स्वाद घ्यावयाचा, हातांनीं विकारोत्तेजक वस्तूंना स्पर्श करावयाचा, आणि तरी जननेंद्रियाला

ताब्यांत ठेवण्याची इच्छा बाळगावयाची हें विस्तवांत हात घालावयाचा आणि न भाजण्याचा प्रयत्न करावयाचा अशासारखें आहे. म्हणून ज्यानें जननेंद्रिय ताब्यांत ठेवण्याचा निश्चय केला आहे त्यानें सर्व इंद्रियांना त्यांच्या विकारांपासून आवरण्याचा निश्चय केलेला असलाच पाहिजे. ब्रह्मचर्याच्या संकुचित व्याख्येनें नुकसान झालें आहे असें मला नेहमीं वाटत आल आहे. माझें असें दृढ मत आणि अनुभव आहे कीं, जर आपण सर्व इंद्रियांना एकदमच वश करण्याचा अभ्यास ठेवला तर जननेंद्रियाला ताब्यांत ठेवण्याचा प्रयत्न लागलीच यशस्वी होऊं शकतो. यांमध्यें मुख्य स्वादेंद्रिय हें आहे, आणि म्हणूनच त्याच्या संयमाला आपण स्वतंत्र स्थान दिलें आहे ... ...

ब्रह्मचर्याचा मूळ अर्थ सर्वांनीं ध्यानांत ठेवावा. ब्रह्मचर्य म्हणजे 'ब्रह्माच्या'—सत्याच्या-शोधार्थ होणारी 'चर्या' म्हणजे आचार. या मूळ अर्थामधून सर्वेन्द्रियसंयम हा विशेष अर्थ निघतो. केवळ जननेंद्रियाचा संयम हा अपूर्ण अर्थ तर आपण विसरूनच जाऊं.



## गृहस्थाश्रमाच्या प्रवेशद्वारांत : : २

( हुदली येथें गांधी-सेवा-संघाच्या वार्षिक संमेलनाच्या वेळींच दोन लग्नविधी व दोन उपनयनविधी घडवून आणण्यांत आले होते. लग्नविधींचे किंवा उपनयनविधींचे प्रसंग हे समारंभाचे नसून दीक्षा घेण्याचे असतात. त्यामुळें या दोन्ही विधींमध्यें योग्य तें गांभीर्य आणि मर्यादा पाळण्यांत आल्या होत्या. विधींचे मंत्र संस्कृतमध्यें होते तरी त्या प्रत्येकाचा अर्थ

वधूवरांना समजावून सांगून त्यांच्याकडून ते म्हणवून घेतले जात होते. विधी आटोपल्यानंतर गांधीजींनीं खाजगीरीत्या वधुवरांना जे चार शब्द सांगितले ते सर्वच दंपतींना समजून घेण्याजोगे असल्यामुळें येथें दिले आहेत.)

गांधीजी त्यांना म्हणाले, “ तुम्हांला माहीत असेलच कीं विधी जितक्या प्रमाणांत आपल्यांत कर्तव्याची भावना जागृत करतात, तितक्या प्रमाणांतच माझा त्यांवर विश्वास आहे. माझा मीच विचार करूं लागल्यापासून माझ्या मनाची ही प्रवृत्ति आहे. तुम्ही म्हटलेले मंत्र आणि तुम्ही घेतलेल्या प्रतिज्ञा संस्कृतमध्यें होत्या, पण त्यांचा तुम्हांला अर्थ करून सांगितला होता. मूळचे संस्कृत मंत्रच आपण घेतले याचें कारण हें कीं संस्कृत शब्दांमध्यें एक प्रकारची शक्ति आहे हें मला माहीत आहे आणि त्या शक्तीचा आपल्या मनावर प्रभाव झालेला कोणालाहि आवडेल.

त्या विधीमध्यें वरानें ज्या इच्छा व्यक्त केल्या आहेत त्यांपैकीं एक ही आहे कीं, वधूनें एका चांगल्या सशक्त मुलाची माता व्हावें. यामध्यें गैर असें कांहीं नाहीं. याचा अर्थ प्रजोत्पत्ति करणें आवश्यकच आहे असा होत नाहीं; संततीची इच्छा असेल तरच कडकडीत धर्मभावनेनें विवाह करणें हें आवश्यक आहे, हा त्याचा अर्थ आहे. ज्याला संततीची इच्छा नाहीं त्याला विवाह करण्याची मुळींच गरज नाहीं. विषयवासनेच्या पूर्तीकरितां केलेलें लग्न हें लग्नच नव्हे, तो व्यभिचार आहे. म्हणून आजच्या विधीचा अर्थ हा आहे कीं, पतिपत्नींना दोघांनाहि जर स्पष्टपणें संततीची इच्छा असेल, तरच संग करण्याची मुभा आहे. ही सर्व कल्पनाच पवित्र अशी आहे. म्हणून संग करायचा तो प्रार्थनापूर्वक केला पाहिजे. तो होण्यापूर्वीं कामवासना आणि सुख वाढविण्याकरितां म्हणून योजलेल्या

शृंगारचेष्टा वगैरे नेहमींचे प्रकार असणार नाहीत. जर दुसऱ्या मुलाची इच्छा नसेल तर असा संग आयुष्यांतून एकदांच व्हावा. जे शरीरानें आणि मनानें निरोगी नसतील त्यांना संग करण्याचें कांहीं एक कारण नाहीं आणि जर ते करतील तर तो व्यभिचार होईल. पाशवी क्षुधेच्या शमनार्थ लग्न करायचें असतें असा जर तुम्हांला पूर्वी पाठ मिळाला असेल तर तो तुम्ही विसरून गेलें पाहिजे. तो भाबडा धर्मभोळेपणा आहे. पवित्र अग्निदेवतेच्या समक्ष हा सर्व विधि होत असतो. तुमच्यामध्यें असणारी सर्व कामवासना तो जाळून भस्म करो.

हल्लीं सर्वत्र माजलेली दुसरी एक गैरसमजूत तुम्हीं आपल्या मनांतून काढून टाकली पाहिजे असें माझें सांगणें आहे. असें सांगतात कीं, संयम आणि ब्रह्मचर्य अयोग्य आहेत आणि कामवासनेची पूर्ति व लग्न न करतां संबंध ठेवणें या गोष्टी अगदीं स्वाभाविक आहेत. याच्याइतकी घातकी दुसरी कोणचीहि समजूत नाहीं. आदर्शाप्रत पोंचणें तुम्हांला कदाचित् शक्य होत नसेल, शरीर दुबळें असेल, पण म्हणून आपल्या आदर्शाला खालीं ओढूं नका, अधर्माला धर्म मानूं नका. तुमचें मन दुबळें होईल त्यावेळीं मी जें सांगतों तें ध्यानीं आणा. या पवित्र आणि गंभीर प्रसंगाच्या आठवणीनें तुमचें मन शांत होईल, संयमी होईल. लग्नाचा उद्देशच मुळीं संयम करणें आणि कामवासनेला ऊर्ध्वगामी करणें हा आहे. यावांचून दुसरा कोणताहि हेतु असेल, तर लग्नविधीचा संस्कार त्यासाठीं नाहीं, तो फक्त संततिप्राप्तीकरितांच आहे.

लग्नविधीनें तुम्ही परस्परांचे बरोबरीच्या नात्याचे मित्र म्हणून बांधले गेलां आहां. पतीला जर 'स्वामी' म्हटलें असेल तर पत्नी 'स्वामिनी' आहे. एकमेक एकमेकाचें धनी आहेत, मदतनीस आहेत. जीवनांतील जोखमी आणि कर्तव्यकर्में पार पाडण्याकरितां एकमेकांनीं एकमेकाला सहकार्य द्यायचें आहे. तरुणांनो, मला तुम्हांला हें सांगायचें आहे कीं, तुम्हांला जर चांगल्या बुद्धीची आणि उमद्या भावनांची देणगी मिळाली

असेल तर या तरुण मुलींना त्यांचा संसर्ग लागूं द्या. तुम्ही त्यांचे खरे शिक्षक आणि वाटाडे बना, त्यांना साह्य करा, वाट दाखवा, पण त्यांच्या प्रगतीच्या मार्गांत आडवे पडूं नका, किंवा त्यांना भलतें वळण लावूं नका. तुम्हां उभयतांमध्यें विचार, उच्चार आणि आचार यांची एकतानता होऊन जाऊं दे. आपल्यामध्यें तुम्ही एकमेकांपासून कांहींहि लपवून ठेवूं नये. तुमचीं हृदयें एक होवून जावींत.

"ढोंगी होऊं नका. आपल्याला अशक्य अशा गोष्टींच्या मागें व्यर्थ लागून आपल्या प्रकृतीचा नाश करून घेऊं नका. संयमानें कधींहि शक्ति नाहींशी होत नाहीं. शक्तीचा ऱ्हास होतो तो संयमानें होत नसून बाह्य आचारावर दृढपण ठेवल्यानें होतो. खरा संयमी मनुष्य रोजच्या रोज अधिकाधिक बळ मिळवितो, अधिकाधिक शांति प्राप्त करून घेतो. आत्मसंयमनामधील अगदीं पहिली पायरी म्हणजे विचारांचा संयम. तुम्ही आपल्या मर्यादा समजून घ्या आणि तुम्ही जेवढें करूं शकाल तेवढेंच करा. मीं तुमच्यापुढें आदर्श ठेवला आहे. काटकोनच जणुं आहे तो. काटकोन जमविण्याचा शक्य तेवढा कसून प्रयत्न करा. पण जर त्यांत तुम्हांला यश आलें नाहीं, तरी खेद किंवा लज्जा वाटून घेण्याचें कांहींच कारण नाहीं. उपनयन हा जसा संस्कार आहे, दुसरा जन्म आहे, तसाच लग्न हा संस्कार आहे, नवा जन्म आहे, हें मी तुम्हांला फक्त विशद करून सांगितलें आहे. माझ्या सांगण्यानें घाबरून जाऊं नका किंवा दुर्बल बनूं नका. नेहमीं विचार, उच्चार आणि आचार यांच्यांत संपूर्ण संगति आणण्याचें ध्येय डोळयांपुढें ठेवा. नेहमीं आपले विचार शुद्ध करण्याकडे लक्ष ठेवा कीं सर्व कांहीं भलें होईल. विचाराहून अधिक प्रभावी दुसरें कांहीं नाहीं. विचारामागून उच्चार आणि उच्चारामागून आचार येत असतो. जग हें अशा प्रभावशाली विचारामधूनच निर्माण झालें आहे. आणि जेथें विचार सामर्थ्यसंपन्न आणि शुद्ध आहे तेथें परिणामहि सामर्थ्यपूर्ण आणि शुद्ध असणारच. इतःपर तुम्ही उदात्त अशा आदर्शाचें कवच घालून

सज्ज व्हावें अशी माझी इच्छा आहे. तसें झालें तर कसलाहि मोह तुम्हांला इजा करणार नाहीं, कसलीहि अशुद्धता तुम्हांला स्पर्श करूं शकणार नाहीं याची मी तुम्हांला खात्री देतों.

" आज जे वेगवेगळे विधी तुम्हांला समजावून दिले ते लक्षांत ठेवा. साधासा वाटणारा ' मधुपर्क ' हा विधीच घ्या. सारें जग मधूनें भरलें आहे. इतकेंच कीं साऱ्या जगानें त्यांतील आपला वांटा उचलल्या-नंतरच तुम्ही आपला वांटा उचलावा. याचाच अर्थ त्यागानें तुम्हीं उपभोग घ्यावा ( ' तेन त्यक्तेन भुञ्जीथाः ' ). "

" पण जर संततीची इच्छा नसेल तर लग्न करूंच नये काय ? " एका वरानें विचारलें.

" मुळींच करूं नये. केवळ मैत्री ठेवण्याच्या आदर्श भावनेनें होणाऱ्या लग्नावर माझा मुळींच विश्वास नाहीं.

" शरीरसंगाच्या हेतूनें नव्हे तर स्त्रियांचें रक्षण व्हावें या उद्देशानें पुरुषांनीं त्यांच्याशीं विवाह केल्याचीं कांहीं उदाहरणें आहेत, पण तीं अगदीं विरळाच. ' निर्मळ वैवाहिक जीवन ' या विषयावरील माझें सर्व लिखाण तुम्ही वाचा. महाभारतांत जें मीं वाचलें तें रोज अधिकाधिक मला पटत चाललें आहे. व्यासांनीं ' नियोग ' * केल्याचें त्यांत सांगि-तलें आहे. व्यासाचें रूप सुंदर म्हणून त्यांत वर्णिलेलें नाहीं, तें उलट होतें. त्यांचें रूप भयानक होतें. त्यांनीं प्रणयचेष्टा केल्या नाहींत, तर संग करण्यापूर्वीं त्यांनीं आपल्या सर्वांगाला तूप चोपडून घेतलें. त्यांनीं विषयवासनेनें संग केला नाहीं, संततीकरितां केला. मूल व्हावें ही इच्छा संपूर्णपणें स्वाभाविक आहे. एकदां ती इच्छा पूर्ण झाली कीं मग संग होऊं नये.

" पहिल्या मुलाचें मनूनें ' धर्मज ' म्हणजे धर्मभावनेनें निर्माण झालेलें, आणि नंतरच्या संततीचें ' कामज ' म्हणजे वासनेनें जन्माला आलेली

* नियोग : केवळ वंशवृद्धि करणाऱ्या संततीकरितां परस्त्री किंवा परपुरुष संग.

असें वर्णन केलें आहे. एवढ्यानें थोडक्यांत स्त्री-पुरुष संबंधाचा कायदा समजून येतो. आणि ईश्वर म्हणजे कायदा नव्हे तर दुसरें काय? ईश्वराची आज्ञा पाळणें म्हणजे कायदा पाळणें. ' धर्मे चार्थे च कामे च नातिचरामि ' ( धर्म, अर्थ आणि काम या बाबतींत मी मर्यादा ओलांडणार नाहीं ) ही प्रतिज्ञा तुम्हांला तीन वेळां उच्चारायला सांगितली तें लक्षांत आहे ना? ईश्वरी नियमांप्रमाणें चालण्याला तयार असणारे बोटांवर मोजण्याइतके जरी स्त्री-पुरुष आपल्यामध्यें निघाले, तरी खऱ्या सत्यधर्मी स्त्री-पुरुषांची कुलपरंपरा आपल्यामध्यें निर्माण होईल.

" बा ( कस्तुरबा ) कडे कामवासनेनें पहाण्याचें सोडून दिल्यापासूनच खरोखर मी वैवाहिक जीवनाचा आनंद लुटूं लागलों हें लक्षांत ठेवा. ऐन तारुण्यांत आणि शरीर सुदृढ असतांच, लौकिक दृष्ट्या ज्याला वैवाहिक जीवनाचा आनंद म्हणतात तो उपभोगण्याइतका तरुण असतांनाच, मीं ब्रह्मचर्याचें व्रत घेतलें. माझ्या डोळ्यांपुढें लक्कन् प्रकाश पडला आणि मला दिसून आलें कीं, मी आणि आपण सर्वचजण एका पवित्र कार्याकरितां जन्माला आलों आहोंत. माझें लग्न झालें तेव्हां तें मला समजलें नाहीं. पण जेव्हां मी शुद्धीवर आलों तेव्हां मला वाटलें कीं ज्या कार्याकरितां माझा जन्म आहे, त्या कार्याला लग्नामुळें पोषण मिळावें इकडे माझें लक्ष असलें पाहिजे. त्याच वेळीं खरोखर मला 'धर्मा'ची ओळख पटली. तें व्रत घेतल्यांनंतरच आमच्या जीवनांत खऱ्या आनंदाचा प्रवेश झाला. बा जरी अशक्त दिसत असली, तरी तिचें शरीर सुदृढ आहे आणि म्हणूनच ती सकाळपासून संध्याकाळपर्यंत एकसारखें काम करीत असते. माझ्या विषय-वासनेचें जर ती स्थान बनली असती तर तिच्या हातून कधीं तसें काम झालें नसतें.

" तरी मी उशीरां, म्हणजे कांहीं वर्षें वैवाहिक जीवन काढल्यानंतर, जागा झालों. वेळींच जागृत होण्याच्या दृष्टीनें तुम्ही भाग्यवान् आहांत. माझें लग्न झालें तेव्हां आजुबाजूची परिस्थिति अत्यंत अमंगल होती.

तुम्हांला ती अत्यंत शुद्धमंगल अशी लाभलेली आहे. तरी माझ्यामध्यें एक गुण असा होता कीं ज्यामुळें मी बचावलों. तो म्हणजे सत्यप्रियता. तिनें माझें रक्षण केलें, मला वांचविलें. सत्य हेंच माझ्या जीवनाचा मूलाधार बनलें आहे. सत्यामधून मागाहून अहिंसा आणि ब्रह्मचर्य निर्माण झालें. म्हणून तुम्ही कांहींहि केलेंत तरी स्वतःशीं आणि जगाशीं प्रामाणिक राहा. आपले विचार लपवूं नका. त्यांना व्यक्त स्वरूप देणें हें लज्जास्पद वाटत असल तर त्यांना मनांत स्थान देणें हें अधिकच लज्जास्पद आहे."

हरिजन : २४।४।१९३७

---

## विवाहितांचें ब्रह्मचर्य : : ३

एक मित्र लिहितात :

" संततिनियमनाकरितां संयम हाच सार्वभौम उपाय आहे असें माझेंहि आपल्यासारखेंच पुष्कळ दिवसांपासून मत आहे. स्त्री-पुरुष-संग हा संतती उत्पादनाकरितांच फक्त आहे, तद्व्यतिरिक्त हेतूनें कोणत्याहि स्वरूपांत केलेला संग हा भोगेच्छेची अनैसर्गिक तृप्ति आहे, हें सिद्ध करण्याची जरूर नाहीं; पण कधीं कधीं त्यामुळें माणसापुढें एक मोठा पेंच येऊन उभा राहातो. एकदां किंवा दोनदां संग करूनसुद्धां, समजा, गर्भधारणा झाली नाहीं, तर मग काय करावें ? मर्यादा कुठें घालावी ? संतति उत्पन्न करण्याची सारी आशा कायमची सोडून देणें ही कठिण गोष्ट आहे. दुसऱ्या बाजूनें, अमर्यादपणें संग करीत राहिल्यानें मनुष्याचें सर्व वीर्य निपटून निघतें. पुनः एकदां किंवा दोनदां संग करून पाहूनहि संतति न झाली तर ' तुझें नशीबच नाहीं. आणि म्हणून इतःपर तूं आतां संग

करूं नकोस ' असें त्या व्यक्तीला सांगावें काय ? पण तसा ताबा ठेवण्याला त्या व्यक्तीमध्यें असामान्य निग्रह आणि आध्यात्मिक बळ असावें लागेल. तरुणपणीं किंवा ऐन उमेदीच्या वयांत संतति उत्पन्न करण्याच्या बाबतींत वारंवार प्रयत्न करूनहि अपयश आल्यानंतर उतारवयांत मुलें झाल्याचीं उदाहरणें घडलेलीं नाहींत असें नाहीं. त्यामुळेंहि संपूर्णपणें व्रतस्थ राहावें हें अधिकच अवघड होऊन बसतें. आणि पतिपत्नी एरवीं निरोगी आणि कसल्याहि शारीरिक दोषापासून मुक्त असतात तेव्हां तर परिस्थिति मोठीच बिकट होते. "

ही अडचण मला मान्य आहे; पण ती त्या प्रश्नाच्या मुळांतच आहे. कोणत्याहि प्रगतीच्या मार्गांत अशाच अडचणी पसरलेल्या असतात, आणि त्या अडचणींचा मनुष्य जसजसा निरास करीत जातो, तसतसा तो उत्क्रांतीच्या मार्गानें चढत जात असतो. हिमालयाला पादाक्रांत करण्याच्या प्रयत्नाचीच गोष्ट घ्या. जसजसे तुम्ही उंच उंच चढत जातां तसतसा चढ हा अधिकाधिक खडा होत जातो, चढणें अवघड होत जातें, इतकें कीं सर्वोच्च शिखर पादाक्रांत करणें राहूनच जातें. या साहसांत किती तरी वीरांचें आजपर्यंत बळी पडले आहेत. तरी प्रत्येक वर्षीं नवे प्रयत्न सुरू होतात आणि पुनः त्यांची पूर्वीप्रमाणेंच वासलात लागते. इतकें झालें तरी शोधकांच्या उत्साहावर त्यायोगें पाणी पडलें नाहीं. ही जर हिमालयाला पादाक्रांत करण्याच्या बाबतींत स्थिति, तर स्वतःला जिंकण्याच्या बाबतींत काय बोलायचें ? तें तर त्याहूनहि बिकट काम आहे. पण त्याचें बक्षिसहि तसेंच मोठें आहे. ' हिमालयावर इतके फूट उंच चढलों ' या कल्पनेनें जास्तींत जास्त काय होईल ? कांहीं काळ आनंदानें आणि विजयोन्मादानें फुलून जातां येईल, एवढेंच. पण स्वतःवर विजय मिळविल्याचें बक्षिस आत्मानंद हें आहे. त्या आनंदाला क्षय नसतो, तो वर्धिष्णु असतो. ब्रह्मचर्याच्या शास्त्रांतलें हें सर्वश्रुत अनुभवसिद्ध वचन आहे कीं, ज्या मनुष्यानें ब्रह्मचर्याचे नियम बरोबर पाळले

आहेत त्याचें वीर्यबीज फलद्रूप झाल्यावांचून राहाणारच नाहीं, राहातां कामा नये. आणि हें अगदीं बरोबर आहे. मनुष्य जेव्हां आपलें पशुत्व संपूर्णपणें जिंकतो, तेव्हां अनैच्छिक अब्रह्मचर्य हें असंभवनीय होतें, आणि केवळ वासना-तृप्तीकरितांच वासना तृप्त करून घेण्याची इच्छा मरून जाते. मग संग घडतो तो फक्त संततीच्या इच्छेनेंच घडतो. ‘वैवाहिक ब्रह्मचर्य’ ज्याला म्हणतात त्याचा अर्थ हा आहे. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें, तर जो मनुष्य हा नियम पाळतो, तो जरी गृहस्थजीवन घालवीत असला, तरी त्याला संपूर्णपणें संगापासून विरक्त झालेल्या मनुष्याचीच आणि गुणानेंहि तितक्याच योग्यतेची अवस्था प्राप्त होते. कारण संग हें फक्त संतति-उत्पादनाचें साधन आहे, भोगाचें नव्हें.

व्यवहारांत हा आदर्श संपूर्णपणें क्वचितच उतरतो ही गोष्ट खरी आहे. पण आपले आदर्श घडवितांना आपल्याला आपले दोष किंवा हातून घडणाऱ्या संभवनीय चुका यांच्या भाषेंत विचार करून चालणार नाहीं; परंतु आजची प्रवृत्ति बरोबर याच्या विरुद्ध जाण्याची आहे, आणि कृत्रिम साधनांच्या पुरस्कर्त्यांनीं आपल्यापुढें जवळजवळ स्वैराचार हाच आदर्श आणून ठेवला आहे. अर्थात् स्वैराचार हा कांहीं आदर्श होऊं शकत नाहीं, हें उघड आहे. आदर्शाला आचारांत उतरविण्याच्या बाबतींत कधीं मर्यादा असूं शकत नाहीं. पण कोणीहि कबूल करील कीं, अमर्याद स्वैराचारामुळें त्या व्यक्तीचा किंवा त्या जातीचा निश्चितपणें नाशच व्हावयाचा. म्हणून संयम हाच आपला आदर्श होऊं शकेल, आणि तसा तो प्राचीन कालापासून मानला गेला आहे. याकरितां हा संयम कसा संपादन करावयाचा त्याच्या मार्गाचा शोध करणें हेंच आपलें कर्तव्य ठरतें, त्याला बगल देणें हें ठरत नाहीं.

अनुभवांतीं माझें असें निश्चित मत बनलें आहे कीं, ब्रह्मचर्यपालनाच्या बाबतींत ज्या अडचणी अनुभवाला येतात, त्यापैकीं बहुतेक तत्संबंधींचे नियम माहीत नसल्यामुळें येतात. ते नियम आपल्याला सांपडले तर त्या

तावडतोब नाहींशा होतील. उदा०—पत्रलेखकानें जो एक बिकट प्रश्न चर्चिला आहे त्याचा आपण आदर्शाच्या प्रकाशांत विचार करूं. पहिली गोष्ट म्हणजे, आदर्श अवस्थेंत अशा तऱ्हेची आकस्मिक परिस्थिति उत्पन्न होणारच नाहीं. कारण लहानपणापासूनच ब्रह्मचर्याचे नियम ज्यांनीं पाळले आहेत, अशा नेहमींच्या निरोगी दंपतीमध्यें संग हा कधींहि निष्फल ठरणार नाहीं. पण व्यवहारांत अशा विचित्र गोष्टी घडून येतात खऱ्या. अशा उदाहरणांमध्यें एकच नियम घालून देतां येईल. तो हा कीं मासिकधर्म संपतांच फक्त एक वेळ संग करण्याची मुभा गर्भधारणा होईपर्यंत ठेवावी. या संगाचा हेतु सफल झाला तर त्याचा पुढें निश्चयपूर्वक त्याग केला पाहिजे. कारण केवळ इंद्रियतृप्ति हा त्याचा हेतु कधींहि होतां कामा नये.

शरीराचें आणि मनाचें आरोग्य हें शरीराच्या आणि मनाच्या पावित्र्याच्या प्रमाणांतच वाढत असतें, हा माझा विश्वास माझ्या अनुभवावर आधारलेला आहे. आणि त्यांत नवलहि नाहीं. मानवासारखा अद्भुत प्राणी उत्पन्न करण्याची शक्ति ज्या द्रव्यांत आहे तें द्रव्य जर बरोबर रक्षण केलें गेलें तर त्याचें रूपांतर अद्वितीय असें तेज आणि बळ निर्माण होण्यांत झाल्यावांचून राहाणारच नाहीं. शास्त्रांनीं निरीक्षिलेल्या या सत्याचें प्रत्यंतर कोणालाहि स्वानुभवानें घेतां येईल. आणि हा नियम पुरुषाइतकाच स्त्रियांनाहि लागू आहे. पण खरी अडचण ही आहे कीं, आम्ही आमच्या अंतःकरणांत कामवासनेला थारा देऊन बाहेर मात्र तिच्यापासून सुटण्याचा व्यर्थ प्रयत्न करीत असतों. याचा परिणाम म्हणजे शरीरानें आणि मनानें आपण अगदीं निकामी होतों, आणि गीतेच्या शब्दांत सांगायचें तर, आपण ‘ मिथ्याचारी ’ किंवा दंभमूर्ति बनतों.

हरिजन : २०।३।१९३७

## एक नैतिक पेंच : : : ४

एक मित्र लिहितात :

" अडीच वर्षांपूर्वी या शहरांत एक सामाजिक दुःखद घटना घडून शहरांत खूप खळबळ माजली होती. एका वैश्य गृहस्थाला सोळा वर्षांची एक मुलगी होती. त्या मुलीचा मामा एकवीस वर्षांचा होता आणि तो त्याच शहरांत कॉलेजांत शिकत होता. त्या दोघांचेंहि एकमेकांशीं गुप्त प्रेमसंबंध जडले. मुलगी गरोदर राहिली म्हणतात. खरी गोष्ट बाहेर आली तेव्हां दोघांहि प्रेमिकांनीं विष खाऊन आत्महत्या केली. मुलगी तात्काळच मेली, पण मुलगा इस्पितळांत दोन दिवसांनंतर मेला. या प्रसंगानें शहरांत वादांचें वादळ उठलें आणि साऱ्यांच्या जिभा सळसळूं लागल्या. ही गोष्ट इतक्या थराला गेली कीं, मयत मुलाच्या आईबापांना गांवांत राहाणें अशक्य झालें. कालांतरानें हें वादळ शमत चाललें. पण या प्रसंगाची आठवण लोकांच्या मनांत अजून कायम राहिली आहे आणि जेव्हां जेव्हां तसा एकादा विषय निघतो, तेव्हां तेव्हां हा प्रसंग लोक वरचेवर उकरून काढतात. वादळ ज्यावेळीं अगदीं जोरांत होतें आणि त्या दुर्दैवी मृत प्रेमिकांविषयीं कोणी एक शब्दहि चांगला काढीत नव्हते, त्यावेळीं मीं माझें मत स्पष्टपणें सांगितलें कीं, झाल्या परिस्थितींत त्या तरुण मुला-मुलीला आपल्या मार्गानें जाण्याची मोकळीक द्यायला हवी होती. हें ऐकतांच सर्वांना धक्काच बसला. पण माझें हें अरण्यरुदनच होतें. यासंबंधीं आपलें मत काय आहे ? "

पत्रलेखकाचें नांव गांव त्याच्या सांगण्यावरून मी मुद्दाम जाहीर करीत नाहीं. कारण जुना वाद उकरून काढून त्याला जुन्या जखमा

ताज्या करावयाशा वाटत नाहींत. तसें असलें तरी या नाजुक विषयावर सार्वजनिक रीत्या चर्चा होणें आवश्यक आहे असें मला वाटतें. माझ्या मतें एका विशिष्ट समाजांत ज्या लग्नांना मनाई आहे तीं एकदम किंवा एकाद्दुसऱ्या व्यक्तीच्या इच्छेनें मान्य केली जाणें शक्य नाहीं. त्याच-प्रमाणें अशीं लग्नें करूं इच्छिणाऱ्या तरुण मंडळींच्या आचारस्वातंत्र्यावर आपल्या इच्छेचें दडपण आणून तें स्वातंत्र्य बळजबरीनें काढून घेण्याचा समाजाला किंवा त्या त्या व्यक्तींच्या आप्तांना कांहींहि अधिकार नाहीं. पत्रलेखकानें जें उदाहरण दिलें आहे, त्यावरून मुलगा आणि मुलगी दोघेहि वयांत आलेले होते. त्यांनीं खुशाल स्वतःचा विचार स्वतः केला असता. त्यांना जर एकमेकांशीं लग्न करावें असें वाटत असेल, तर तें करण्यास बळजबरीनें प्रतिबंध करण्याचा कोणालाहि अधिकार नव्हता. समाजाला फार तर 'आम्ही या लग्नाला संमति देत नाहीं' असें म्हणतां आलें असतें; पण त्यांच्यावर आत्महत्या करण्याची पाळी येणें ही जुलमाची पराकाष्ठा झाली.

"विवाहासंबंधाचे निषेध हे सर्वत्र सारखे नाहींत, ते बव्हंशीं सामाजिक रूढीवर अवलंबून असतात. ही रूढि प्रांताप्रांताला आणि जिल्ह्या-जिल्ह्याला बदलते. याचा अर्थ तरुणांनीं सर्वच प्रस्थापित सामाजिक रूढी आणि निषेध पायाखालीं तुडवावेत असा नाहीं. तसें करण्याचें ठरविण्या-पूर्वी त्यांनीं लोकमत आपल्या बाजूला वळवून घेतलें पाहिजे. दरम्यानच्या काळांत, त्यांनी धीरानें योग्य वेळेची वाट पाहिली पाहिजे, किंवा क्षुब्ध न होतां शांतपणें वाट पहाणें त्यांना शक्य नसलें, तर सामाजिक बहि-ष्काराच्या परिणामांना त्यांनीं तोंड दिलें पाहिजे.

त्याचप्रमाणें प्रस्थापित रूढी न मानणाऱ्या किंवा त्या मोडणाऱ्यांच्या बाबतींत निर्दयपणाची, सावत्र वृत्ति न दाखविणें हें समाजाचेंहि कर्तव्य आहे. पत्रलेखकानें जें उदाहरण दिलें आहे त्यांतील हकिकत जर बरोबर

असेल, तर त्या तरुण जोडप्याला शेवटीं आत्महत्या करावयास भाग पाडण्ययाचा गुन्हा निःसंशय समाजाच्याच माथ्यावर येऊन पडतो.”

हरिजन : २०।५।१९३७

---

## विवाहाचा आदर्श : : : ५

एक मित्र लिहितात :

“‘एक नैतिक पेंच’ या शीर्षकाखालीं ताज्या ‘हरिजन-सेवका’च्या अंकांत आपण म्हटलें आहे कीं, ‘विवाहाच्या बाबतींत निषिद्ध ठरलेल्या पुष्कळ गोष्टी सामाजिक रूढींतून निघालेल्या दिसतात. त्यांच्या बुडाशीं कोणतेंहि महत्त्वाचें नैतिक वा धार्मिक तत्त्व असलेलें कोठेंहि आढळून येत नाहीं’ स्वानुभवावर आधारलेली माझी स्वतःची अंतःप्रेरणा मला असें सांगते कीं, हे निषेध बहुधा सुप्रजाजननाच्या विचारांनींच फैलावले असावे. सुप्रजाजनन-शास्त्राचें हें तत्त्व सुप्रसिद्ध आहे कीं, भिन्न गोत्रांच्या बीजांचा संकर होऊन उत्पन्न झालेलें अपत्य हें सुप्रजाजननशास्त्राच्या दृष्टीनें सगोत्र मिश्रणाच्या अपत्यापेक्षां अधिक सुयोग्य बनतें. याच कारणानें हिंदुधर्मानें सगोत्र आणि सपिंड विवाहांचा निषेध केला आहे. उलट, या निषेधाचें एकमेव कारण चित्रविचित्र प्रकारांच्या व फरक पडत जाणाऱ्या सामाजिक चालीरीती हेंच जर मानलें, तर मग चुलता–पुतणी यांच्यांतच नव्हे, तर भावा बहिणींतसुद्धां लग्न होणें सर्वस्वीं निषिद्ध कां समजावें, याला कांहीं बळकट कारण मिळत नाहीं. जर आपल्या म्हणण्या-प्रमाणें संतानोत्पत्ति हाच लग्नाचा सयुक्तिक हेतु असेल, तर मग वरवधूंची निवड हा निव्वळ सुप्रजाजननाच्या दृष्टीनें परस्परानुरूपतेचाच प्रश्न राहील.

मग इतर सर्व मुद्दे त्या मानानें बिनमहत्त्वाचे म्हणून बाजूला सारायचे काय? जर तसे सारायचे नसतील, तर ज्या मुद्यांना अगोदर प्राधान्य द्यावयाचें त्यांचा अनुक्रम आपण कसा लावाल? मी तो अनुक्रम पुढीलप्रमाणें लावतों :

( १ ) परस्परांविषयीं आकर्षण किंवा प्रीति.

( २ ) सुप्रजाजननाच्या दृष्टीनें योग्यता.

( ३ ) त्यांच्या त्यांच्या कुटुंबांची पसंती आणि संमति; त्याचप्रमाणें ज्या ज्ञातीचा तो अथवा ती असेल त्या ज्ञातीच्या हिताचा विचार.

( ४ ) आध्यात्मिक विकास.

याविषयीं आपलें काय म्हणणें आहे?

" हिंदु शास्त्रांनीं विवाहाचा एकमेव हेतु प्रजोत्पत्ति हाच आहे असें स्पष्टपणें सांगितलें आहे. लग्नाच्या वेळीं वधूला वडील माणसें 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' असा जो प्राचीन आशीर्वाद देतात तो हेंच दाखवितो. विवाहानंतर होणारा संग हा फक्त संतानोत्पत्तीकरितांच व्हावा, इंद्रिय-सुखाकरितां होऊं नये, या आपल्या म्हणण्याला या योगें पुष्टीच मिळते. पण मग विवाहित दंपतीनें एक अपत्य झालें कीं तेवढ्यावरच संतोष मानावा, तें अपत्य मग मुलगा असो कीं मुलगी असो, अशी आपली अपेक्षा आहे काय? आपला वंश चालू राहावा ही मनुष्याला इच्छा असते हें आपण बरोबर ओळखलें आहे. या इच्छेव्यतिरिक्त आमच्या-मध्यें दुसरीहि एक जोरकस भावना असते, कीं ही वंशवृद्धि फक्त मुलगा झाला तरच योग्य रीतीनें होऊं शकते. म्हणून मुलीपेक्षां मुलाचा आनंद जास्त होत असतो. सर्वत्र असलेली ही मुलाविषयींची तीव्र इच्छा लक्षांत घेतां फक्त एकच अपत्य असावें या आपल्या आदर्शाला थोडें मर्यादित स्वरूप द्यावें आणि मुली झाल्या तरी मुलगा होईपर्यंत संग करायला हरकत नाहीं असें ठरवावें, असें आपल्याला वाटत नाहीं काय?

"जी विवाहित व्यक्ति संतानोत्पत्तीच्या हेतूपुरताच संग कडकपणें मर्यादित ठेवते त्या व्यक्तीला ब्रह्मचारी म्हणतां येईल, या आपल्या मताशीं मी सर्वस्वीं सहमत आहें.(ज्या दंपतीनें विवाहापूर्वी आणि नंतर पावित्र्याचा आणि संयमाचा नियम पाळला आहे त्या दंपतीला एकच वेळ केलेल्या संगानें गर्भधारणा झाली पाहिजे, या आपल्या मताशींहि मी सहमत आहें.)आपल्या पहिल्या मुद्याला आपल्या शास्त्रांत विश्वामित्र आणि अरुंधती या प्रसिद्ध कथेंत आधार सांपडतो. वशिष्ठाची पत्नी अरुंधती हिला शंभर मुलगे झाले तरी विश्वामित्र तिला 'ब्रह्मचारिणी' म्हणून गौरवितो. तिच्या आज्ञा पंचमहाभूतांनासुद्धां पाळल्यावांचून गत्यंतर नसे. कारण तिचा आपल्या पतीशीं वैवाहिक संबंध निव्वळ मातेच्या कार्याची संपादणी आणि बजावणी करण्याच्या दृष्टीनेंच होता. पण फक्त एकच अपत्य– मग तें मुलगा असो किंवा मुलगी असो– असावें या आपल्या आदर्शाला हिंदुशास्त्रांचासुद्धां आधार मिळेल कीं नाहीं याची मला शंका वाटते. म्हणून, मुलीच जन्माला आल्या तर त्यांच्या जोडीला एक मुलगा व्हावा ही गोष्ट समाविष्ट करण्याइतका वैवाहिक जीवनाविषयींचा आपला आदर्श आपण व्यापक केलात, तर पुष्कळ विवाहित दंपतींना त्यामुळें संतोष होईल. नाहींपेक्षां एका मुलाच्या जन्मापुरताच संबंध मर्यादित ठेवायचा आणि तें मूल स्त्री असो किंवा पुरुष असो, मग सर्व आयुष्यभर संपूर्ण ब्रह्मचर्य पाळायचें ही गोष्ट बहुतेक लोकांना कठिण होईलसें वाटतें. त्यापेक्षां मुळींच लग्न न केलेलें त्यांना परवडेल. माझें हळुहळू असें मत बनूं लागलें आहे कीं कामेच्छा हा मनुष्याचा मूळचा स्वभाव आहे, संयम हा अभ्यासानें वाढविलेला सद्गुण आहे. धर्म आणि अध्यात्म हा जो मनुष्याच्या विकासाचा नैसर्गिक नियम, त्याकडे नेणारी उत्क्रांतिपथ'वरील एक पायरी तो दाखवितो. यामुळेंच संयमाला इतकें वरचें स्थान प्राप्त झालें आहे. फक्त संततिसाधन म्हणून संगाला मानून त्या आदर्शाला जो धरून राहातो अशा मनुष्याबद्दल

मला आदर वाटतो. दुसऱ्या कोणत्याहि कारणाकरितां संग करणें हा इंद्रियांचा स्वैराचार आहे, हेंहि मला मान्य आहे. पण तसा संग झाला तर तें अत्यंत बीभत्स पाप असें समजून त्याचा धिक्कार करण्याला किंवा आपल्या निसर्ग-स्वभावाला आवरूं न शकणाऱ्या पतिपत्नींना पतित समजून त्यांच्याकडे कींव करण्याच्या किंवा अत्यंत तिरस्काराच्या दृष्टीनें पहायला मात्र मी तयार नाहीं."

वैवाहिक संबंधाच्या बाबतींत जे निरनिराळे निषेध प्रचलित आहेत त्यांच्या बुडाशीं काय शास्त्रीय तत्त्व आहे हें मला माहीत नाहीं. पण मला असें स्पष्ट दिसतें कीं, जी सामाजिक रूढि किंवा प्रघात सद्गुण आणि संयम आचरण्याला मदत करतो त्याला नीति-नियमाइतकेंच पवित्र मानलें पाहिजे. भावा-बहिणींमधील विवाहांना प्रतिबंध करण्याच्या मुळाशीं जर सुप्रजाजननासंबंधींचीं कारणें असतील तर तीं कारणें चुलत भावा-बहिणींमधील विवाहांनासुद्धां तशींच लागू झालीं पाहिजेत. म्हणून आचाराचा सुरक्षित नियम हा कीं, एकाद्या विशिष्ट समाजांत अशा अंमलांत असलेल्या निषेधांना सामान्यपणें मान द्यावा. पत्रलेखकानें आदर्श विवाहाच्या दृष्टीनें ज्या गोष्टी नमूद केल्या आहेत त्यांना सर्वसाधारणपणें माझी मान्यता आहे. पण त्यांच्या महत्वाचा अनुक्रम मात्र मी बदलीन आणि 'प्रीती' ला त्या यादींत शेवटचें स्थान देईन. प्रीतीला पहिलें स्थान दिल्यानें इतर गोष्टींचें महत्त्व तिच्यापुढें कमी होण्याचा आणि त्या जवळजवळ क्षुल्लक ठरण्याचा संभव आहे. म्हणून, विवाहाच्या बाबतींत पसंती करतांना आध्यात्मिक विकासाला पहिलें स्थान दिलें पाहिजे. त्याच्या खालोखाल सेवेला, त्याच्या खालोखाल कौटुंबिक गोष्टींना व ज्ञातीच्या हितसंबंधाला आणि चवथें शेवटचें स्थान 'प्रीती' ला किंवा परस्पराकर्षणाला दिलें जावें. याचा अर्थ, जेथें इतर तीन गोष्टी पुऱ्या केल्या जात नाहींत तेथें 'प्रीति' हें कारण लग्नाला योग्य आहे असें समजलें

जाऊं नये; त्याचबरोबर, इतर गोष्टी जरी पुऱ्या होत असल्या तरी जेथें प्रीति नाहीं असें लग्न बाजूला सारलें पाहिजे. मी तर सुप्रजाजननविषयक योग्यतेची अट खोडूनच काढीन; कारण विवाहाचा मुख्य हेतु संतति-उत्पादन हा असल्यामुळें सुप्रजाजननासंबंधीं वी योग्यता ही निव्वळ 'अट' म्हणतां येणार नाहीं, ती विवाहाचें अपरिहार्य अंगच मानलें पाहिजे.

हिंदुशास्त्रें पुरुष-अपत्य असावें असा उघडउघड पक्षपात दाखवितात खरीं. पण याचें मूळ शरीरबलावर ज्या वेळीं सरसहा युद्धें चालत असत अणि जीवनकलहामध्यें मनुष्यबळ हेंच ज्यावेळीं विजयाचें अपरिहार्य अंग असे त्यावेळच्या परिस्थितींत सांपडतें. त्यामुळें एका मनुष्याला असलेल्या पुत्रांची संख्या ही त्या मनुष्याच्या पुरुषत्वाचें आणि बळाचें चिन्ह म्हणून मानलें जात असें, आणि पुष्कळ मुलें जन्माला यावींत याकरितां बहुपत्नीत्वसुद्धां मान्य केलें गेलें होतें, त्याला उत्तेजन दिलें जात होतें. पण जर विवाहाला आपण धार्मिक संस्कार मानीत असूं तर त्यांत एकाच अपत्याला अवकाश आहे, आणि म्हणूनच आपल्या शास्त्रांत पहिल्या अपत्याला ' धर्मज ' म्हणजे धर्मा-पासून उत्पन्न झालेलें म्हटलें आहे, आणि त्यानंतर उत्पन्न होणाऱ्या सर्व संततीला ' कामज ' कामविकारापासून जन्माला आलेली म्हटलें आहे. मुलगा आणि मुलगी यांत मी भेद करीत नाहीं. माझ्या मतें तसा भेद करणें द्वेषजनक आणि अन्यायाचें होईल. मुलगा झाला काय किंवा मुलगी झाली काय, दोहोंचाहि आनंदच वाटावा.

संतानोत्पत्तीच्याच फक्त इच्छेनें केलेला संग हा ब्रह्मचर्याच्या अत्युच्च आदर्शाला विसंगत नाहीं या तत्वाचें उदाहरण म्हणून वसिष्ठ—विश्वा-मित्रांची कथा ठीक आहे. पण ही कथा अक्षरशः घ्यायची नाहीं. इंद्रियतृप्तीकरितां संग करणें म्हणजे पशुत्वाकडे परत वळणें आहे, आणि म्हणून त्याहून उच्च होण्याचा मनुष्याचा प्रयत्न असला पाहिजे. पण

त्यांत अपयश येणें —उदा० पतिपत्नींच्या संबंधाच्या बाबतींत— हें पाप आहे किंवा ती निंद्य वस्तु आहे असें मानतां येणार नाहीं. करोडो लोक या जगांत आपल्या जिभेची तृप्ति करण्याकरितां खातात; त्याचप्रमाणें करोडो पतिपत्नी इंद्रियतृप्तीकरितां हवा तितका संग करतात आणि करीत राहातील; आणि निसर्गाचे नियम मोडल्यामुळें असंख्य आजारांच्या रूपानें कठोर अशी शिक्षाहि त्यांना भोगावी लागेल. शुद्ध ब्रह्मचर्याचा किंवा विवाहित ब्रह्मचर्याचा आदर्श हा आध्यात्मिक किंवा उच्च जीवनाची साधना करणाऱ्यांच्याकरितां आहे. अशा जीवनाचें तें अपरिहार्य अंग आहे.

हरिजन : ५।६।१९३७

---

## एका तरुणाची शंका : : ६

'हरिजन' मध्यें तरुणांना उद्देशून लिहिलेल्या माझ्या लेखांमधून उद्भवणाऱ्या एका प्रश्नाचें उत्तर एका पत्रलेखकाला पाहिजे आहे; पत्रलेखक आपलें नांव देऊं इच्छित नाहीं. निनांवी पत्रांकडे दुर्लक्ष करणें हा जरी योग्य नियम असला, तरी पुढें मांडलेला प्रश्न जेव्हां महत्त्वाचा असतो, तेव्हां मी या बाबतींत केव्हां केव्हां अपवाद करतों. आजचा प्रश्न तसा आहे.

हें पत्र हिंदींत लिहिलेलें आहे आणि वाजवीपेक्षां अधिक लांब आहे. त्याचा मथितार्थ असा:

" आपल्या लिखाणावरून आपल्याला तरुणांचीं मनें कळतात कीं नाहीं याविषयीं मला शंका वाटते. आपल्याला जें शक्य झालें तें सर्वच

तरुण माणसांना शक्य होईल असें नाहीं. माझें लग्न झालें आहे. मी संयम करूं शकतों, माझी पत्नी करूं शकत नाहीं. तिला संततीची इच्छा नाहीं, पण तिला भोगाची मात्र इच्छा आहे. मी काय करावें ? तिची इच्छा पुरविणें माझें कर्तव्य नाहीं काय ? इतर मार्गांनीं तिची इच्छा पुरविली जावी असें इच्छिण्याइतका मी उदार नाहीं. वृत्तपत्रांवरून मला दिसून येतें कीं, लग्नांचा पुरस्कार करण्याच्या आणि त्यांना आशीर्वाद देण्याच्या बाबतींत आपण विरुद्ध नाहीं. पण आपण जाणत असाल किंवा आपण जाणलें पाहिजे कीं, आपण ज्या उच्च हेतूचा उल्लेख केला तशा उच्च हेतूनेंच लग्नें जुळतात असें नाहीं."

पत्रलेखकाचें म्हणणें बरोबर आहे. लग्नाचें वय, खर्च इ. बाबतींत मीं ठेवलेल्या कसोट्या पाळल्या जातात तेव्हां तशा अनेक लग्नांना माझा आशीर्वाद असतो. एवढ्यावरून कदाचित् कांहींसें दिसून येण्याजोगें आहे कीं, देशांतील तरुण जेव्हां माझ्याकडून मार्गदर्शनाची इच्छा करतात, तेव्हां माझें तें मार्गदर्शन समर्थनीय ठरण्याइतपत मी त्यांना ओळखतों.

प्रस्तुत पत्रलेखकाचें उदाहरण मासलेवाईक आहे. त्याच्याविषयीं आपल्याला सहानुभूति वाटली पाहिजे. स्त्री-पुरुष-संगाचा प्रजोत्पत्ति हाच एकमेव उद्देश आहे हा मला नवीन शोधच लागल्यासारखा आहे. हा नियम मला पूर्वीं माहीत होता, तरी योग्य तितकें महत्त्व मीं पूर्वीं कधींहि दिलें नव्हतें. ती एक केवळ सदिच्छा असावी अशीच माझी अगदीं परवांपर्यंत समजूत होती असें म्हटलें तरी चालेल. आज मी त्याला विवाहित जीवनाचा मूलभूत कायदा म्हणून मानीत आहें, आणि जर त्याचा सार्वभौम महिमा योग्य प्रकारें ओळखला गेला, तर हा कायदा पाळणें कांहीं कठिण नाहीं. समाजांत या कायद्याला योग्य स्थान दिलें गेलें कीं माझा उद्देश सफल झाला. मला तर तो जिवंत कायदा वाटतो. आपण तो नित्य मोडतों आणि मग त्याबद्दल जबर शिक्षा भोगतों. सदरहु पत्रलेखक जर या कायद्याची अमूल्य किंमत ओळखील, जर त्याचें आपल्या पत्नीवर प्रेम असेल,

स्वतःवर त्याची श्रद्धा असेल, तर तो तिला आपल्या मताकडे ओढून घेईल. 'मी स्वतःला संयमी राखूं शकतों' असें तो म्हणतो. तें अगदीं खरें–मनापासूनचें–आहे काय? त्याच्या स्वतःच्या बाबतींत त्याचा पाशवी विकार कांहीं उच्चतर तळमळींत–उदा. आपल्या मानवबंधूंच्या सेवेप्रीत्यर्थ – रूपांतरित झाला आहे काय? पत्नीमधील विकाराला उत्तेजन मिळेल अशा तऱ्हेच्या कोणत्याहि कृतीपासून तो स्वाभाविकपणें अलिप्त आहे काय? हिंदुशास्त्रांत संगाचे आठ प्रकार सांगितले आहेत, त्यांत संकेतांनीं केलेल्या कामुक सूचनांचासुद्धां समावेश केला आहे हें त्यानें जाणून घ्यावें. पत्रलेखक त्यापासून मुक्त आहे काय? जर तो तसा नसेल, जर त्याला पत्नीचें मन कामवासनेपासून वळविण्याची खरोखर इच्छा असेल, तर त्यानें तिच्याभोंवतीं शुद्धतम प्रेमाची पांखर पसरावी. तिला त्यानें निसर्गनियम समजावून द्यावा, प्रजोत्पादनाची इच्छा नसतांना केलेल्या संगाचे शारीरिक परिणाम काय होतात हें समजावून द्यावें, जीवनाधार असें तें द्रव्य काय आहे तें त्यानें तिला सांगावें. पुढें त्यानें आपल्या पत्नीला हितप्रद अशा कोणत्यातरी व्यवसायांत गुंतवावें आणि तिचा आहार, व्यायाम नियमितपणें व्हावा अशासाठीं प्रयत्न करावा. यायोगें तिच्यांतील विकार शमतील. आणि मुख्यत्वेंकरून, तो जर धार्मिक वृत्तीचा असेल, तर त्यानें आपल्या सहचारिणीमध्यें आपली जिवंत श्रद्धा ओतण्याचा प्रयत्न करावा. कारण मला हें कबूल केलें पाहिजे कीं, ब्रह्मचर्याचा कायदा पाळणें हें ईश्वरावरील म्हणजेच चैतन्यमय सत्यावरील जिवंत श्रद्धेवांचून अशक्य आहे. जीवनांतून ईश्वराची साफ हकालपट्टी करण्याची, आणि चैतन्यमय ईश्वरावर जिवंत श्रद्धा ठेवण्याची आवश्यकता न मानतां उच्चतम जीवनाकडे पोंचतां येईल असा आग्रह धरण्याची अलिकडे एक फॅशनच पडली आहे. आपल्यापेक्षां अनंत पटीनें उच्च अशा एका महान् शक्तीवर ज्यांचा विश्वास नाहीं व ज्यांना तिची गरज नाहीं त्यांच्या गळीं ईश्वरी नियमाचें सत्यत्व

उत्तरविण्यास मी असमर्थ आहे हें मला कबूल केलें पाहिजें. ज्या चैतन्य-पूर्ण ईश्वरी नियमाच्या आज्ञेनें हें सर्व विश्व चालत आहे त्या नियमावर अचल श्रद्धा ठेवल्याशिवाय संपूर्ण जीवन अशक्य आहे असें ज्ञान माझ्या स्वतःच्या अनुभवानें मला दिलें. अशी श्रद्धा नसलेला मनुष्य समुद्रांतून बाजूला फेकल्या गेलेल्या बिंदूप्रमाणें नाशच पावणार. सागरांतील प्रत्येक बिंदू सागराबरोबरच त्याचें वैभव उपभोगतो आणि आमचें जीवनतत्त्व आम्हांला प्रदान करण्याचा मानहि त्याला प्राप्त होतो.

हरिजन : २५।४।१९३६

---

## जनक नसलेला पिता : : ७

एका तरुणानें मला एक पत्र पाठविलें आहें, त्याचा फक्त सारांश येथें देणें शक्य आहे. तो खालीलप्रमाणें :

“ मी एक विवाहित गृहस्थ आहें. मी परदेशाला गेलों होतों. माझा एक मित्र होता, त्याच्यावर माझा आणि माझ्या आई-वडिलांचा संपूर्ण विश्वास होता. मी येथें नसतांना त्यानें माझ्या पत्नीला फुसलाविलें आणि ती आतां त्याच्यापासून गरोदर राहिली आहे. या मुलीचा गर्भपात करविला पाहिजे, नाहींपेक्षां कुळाची बेअब्रू होईल, असें माझे वडील म्हणत आहेत. तसें करणें चूक होईल असें मला वाटतें. ती बिचारी स्त्री तीव्र पश्चात्तापानें होरपळत आहे. तिला खाण्यापिण्याचीहि शुद्धी नाहीं, सारखी रडते आहे. अशा बाबतींत माझें कर्तव्य काय, तें मला कृपा करून सांगाल काय ? ”

हें पत्र मीं मोठ्या कष्टानें प्रसिद्ध केलें आहे. अशा गोष्टी समाजांत विरळा नाहींत हें सर्वांना माहीत आहे. म्हणून या प्रश्नाची संयमपूर्वक चर्चा करणें अवास्तव नाहीं असें मला वाटतें.

गर्भपात करविणें हा गुन्हा आहे हें मला सूर्यप्रकाशाप्रमाणें स्वच्छ दिसतें. असंख्य नवऱ्यांच्या हातून या गरीब स्त्रीप्रमाणेंच दोष घडत असतांहि त्यांना कोणी त्याबद्दल विचारीत नाहीं. समाज त्याकडे दुर्लक्ष करतो. इतकेंच नव्हे, तर त्यांची निर्भर्त्सनाहि करीत नाहीं. आणि शिवाय स्त्रीला स्वतःची बेअब्रू छपवितां येत नाहीं, पुरुषाला मात्र आपलें पाप व्यवस्थित रीतीनें झांकतां येतें.

सदर स्त्रीची कींव केली पाहिजे. वडिलांचें म्हणणें न ऐकतां आपल्या अंतःकरणांत असेल नसेल तेवढ्या प्रेमानें आणि वात्सल्यानें त्या मुलाचें पोषण करणें हेंच नवऱ्याचें पवित्र कर्तव्यकर्म आहे. त्यानें आपल्या स्त्रीला नांदवावी किंवा नाहीं हा जरा अवघड प्रश्न आहे. परिस्थितीनें कदाचित् तिच्यापासून वेगळें होणें हेंच युक्त असेल. तसें असेल तर तिच्या निर्वाहाची व शिक्षणाची व्यवस्था करण्याला आणि तिनें आपलें जीवन शुद्धपणें घालवावें यासाठीं तिला मदत करण्याला तो बांधलेला राहील. जर तिला झालेला पश्चात्ताप अंतःकरणापासूनचा आणि खराच असेल,तर तिचा स्वीकार करण्यांतसुद्धां मला कांहीं अयोग्य वाटणार नाहीं. इतकेंच नव्हे तर, जर पत्नीनें संपूर्णपणें प्रायश्चित्त घेतलें असेल, आणि चुकीची भरपाई केली असेल, तर त्या आपल्या चुकलेल्या पत्नीला पदरांत घेणें हें पतीचें पवित्र कर्तव्य होईल, अशाहि स्थितीची कल्पना मी करूं शकतों.

यंग इंडिया : ३-१-१९२९

## त्याचें कारण : : ८

बंगलोरहून एक गृहस्थ लिहितात :

"आपण म्हणतां कीं, विवाहित दंपतीला संततीची इच्छा असेल तरच त्यांचा संग घडावा, अन्यथा घडूं नये. पण संततीची इच्छाच मुळीं कां ठेवावी हें मला कृपा करून सांगा. पुष्कळसे लोक आईबाप होण्याची जबाबदारी म्हणजे काय हें न जाणतांच मुलांची इच्छा धरतात; तर याहूनहि पुष्कळ असे आहेत का, आपण आपली मातृपितृत्वाची जबाबदारी पार पाडूं शकणार नाहीं हें माहीत असूनहि मुलांची इच्छा करतात. शारीरिक व मानसिक दृष्टया मातृपितृत्वाला नालायक असणारेसुद्धां अनेकजण मुलें पाहिजेत म्हणतात. अशा लोकांनीं संतति उत्पादन करणें हें चुकीचें आहे, असें नाहीं आपल्याला वाटत ?

"संततीच्या इच्छेमागें काय हेतु आहे हें जाणून घेण्याची मला इच्छा आहे. अनेक लोक आपल्या इस्टेटीला वारस पाहिजे म्हणून आणि आपल्या आयुष्यांतला एकाकीपणा जावा म्हणून मुलांची इच्छा करतात. कांहीं थोडे लोक मुलगा झाला नाहीं तर आपल्याला स्वर्गाचें दार खुलें होणार नाहीं म्हणून मुलांची इच्छा करतात. मुलांची इच्छा धरण्यांत या लोकांची चूक नाहीं काय ? "

वस्तूंचीं कारणें शोधणें हितप्रद असतें. पण नेहमींच तीं सांपडतात असें नाहीं. संततीची इच्छा ही सार्वत्रिक आहे. पण तिच्या मुळाशीं आपल्या वंशजांच्या द्वारा आपल्याला चिरस्थायी बनलेलें पहाणें हें जर पुरेसें आणि खात्री पटविण्याजोगें कारण नसेल, तर याव्यतिरिक्त दुसरें कोणतेंहि खात्रीचें कारण मला माहीत नाहीं. पण हें मीं दिलेलें कारण जरी पुरेसें खात्री पटविण्याजोगें वाटत नसलें, तरी माझा

सिद्धांत कांहीं रद्द ठरत नाहीं. इच्छा कायमच राहाते. ती नैसर्गिक आहे असें वाटतें. जन्माला आल्याबद्दल मला दुःख होत नाहीं. माझ्यामध्यें जें अत्युत्कृष्ट आहे तें पुनः उत्पन्न झालेलें पहाण्याची जर मला इच्छा झाली तर तें कांहीं धर्मविरुद्ध नाहीं. कांहीं असो; जोंवर खुद्द संततीउत्पादनामध्येंच मला कांहीं पाप दिसत नाहीं आणि जोंवर केवळ मजेखातर संग करणें हें योग्य आहे असें मला वाटत नाहीं, तोंवर संग हा संततीची इच्छा असेल तेथेंच योग्य आहे असेंच मीं मानलें पाहिजे. स्मृतिकारांना ही गोष्ट इतकी स्पष्ट झालेली मला दिसते कीं, मनुभगवानांनीं पहिल्या अपत्याला 'धमज' असें नांव दिलें आणि बाकीच्यांना 'कामज' म्हटलें. या विषयाकडे मी जितक्या जितक्या निःपक्षपातीपणें पाहूं लागतों तितकी तितकी माझी खात्री पटते कीं, मीं घेतलेली आणि आचारांत आणीत असलेली भूमिकाच बरोबर आहे. या विषयासंबंधीं जें अज्ञान आहे आणि त्याच्याभोंवतीं जी निष्कारण गुप्तता ठेवण्यांत आली आहे, त्यामुळेंच अडचणी उत्पन्न होतात असें मला स्पष्ट दिसून येत आहे. आपल्या विचारावर त्यामुळें पटल येतें. आपण परिणामाला तोंड द्यायला भितों. अर्धवट उपायांनाच पूर्ण किंवा शेवटचे समजून आपण त्यांचा आसरा घेतों आणि अशा रीतीनें ते अमलांत आणणें अत्यंत कठिण होऊन बसतें. आपले विचार जर स्पष्ट असते, आपल्या भूमिकेविषयीं जर आपल्याला खात्री असती, तर आपली भाषा आणि कृति निश्चित स्वरूपाची राहिली असती.

तव्हां मी घेत असलेल्या प्रत्येक घांसाविषयीं माझी जर अशी खात्री असेल कीं, हा माझें शरीर बांधण्याकरितां आणि टिकविण्याकरितां मी खात आहें, तर मी जिभेच्या चैनीकरितां अन्न घेण्याची कधींहि इच्छा करणार नाहीं.

पुढें मला असेंहि कळून येईल कीं, जर अमुक वस्तु खमंग आहेत म्हणून मला खाण्याशा वाटतात, मला भूक लागली आहे म्हणून किंवा त्या शरीर

टिकविणाऱ्या आहेत म्हणून त्या खाण्याची इच्छा होते असें नाहीं, तर हें रोगाचें चिन्ह आहे, त्यापासून बरें होण्याचा मला प्रयत्न केला पाहिजे, आणि खाण्याची ती इच्छा योग्यच आहे किंवा आरोग्यदर्शकच आहे असें समजून तिला मीं संतोषवितां कामा नये. बरोबर तसेंच; प्रजोत्पत्तीची न्याय्य इच्छा सोडली तर, जर मला संग करणें हें अधर्म्य आणि शरीराचा, मनाचा, आणि आत्म्याचा नाश करणारें आहे असें अगदीं स्पष्टपणें वाटत असेल, तर संगविषयक वासनेचा प्रतिकार करणें मला सोपें जाईल. केवळ वासनेची तृप्ति करणें हें धर्म्य आणि हितकर आहे कीं नाहीं याविषयीं माझे विचार स्पष्ट झालेले नसतांना तें जितकें सोपें होईल, त्याहून कितीतरी अधिक सोपें हे विचार स्पष्ट झाल्यानें होईल. वासनेच्या अधर्म्य स्वरूपाविषयीं जर माझ्या डोक्यांत स्पष्टपणा आला असेल, तर त्या वासनेला एखाद्या रोगाप्रमाणें मानून तिचे माझ्यावर होणारे हल्ले शक्य तितक्या जोरानें मी परतवून लावीन. हा प्रतिकार केल्यानें माझें बळ वाढलेलें मला आढळेल. संग आपल्याला आवडत नाहीं, पण आपलें कांहीं चालत नाहीं; आणि त्यामुळें विरोध केल्यानें आपण निःशक्त आणि पराभूत होतों असें जे म्हणतात ते चूक आहेत; इतकेंच नव्हे, ते अप्रामाणिक आहेत. या सर्व लोकांनीं स्वतःचें निरीक्षण करण्याचें मनांत आणलें, तर आपले विचार आपल्याला फसवीत आहेत असेंच त्याना आढळून येईल. मनामध्यें या वासनेचा त्यांना आनंद वाटत असतो आणि त्यांची वाणी मनाचें खोटें स्वरूप बाहेर दाखविते. पण उलट, जर त्यांची वाणी विचारांचें खरेंखुरें स्वरूप दाखवील, तर दुर्बलता अशी वस्तूच त्यांना आढळणार नाहीं. पराभूतता असूं शकेल, दुर्बलता मात्र मुळींच असणार नाहीं.

पत्र–लेखकानें निरोगी नसलेल्या पतिपत्नींनीं संतति उत्पन्न करूं नये असें जें म्हटलें आहे, तें अगदीं बरोबर आहे. त्यांना संततीची इच्छा असूं नये किंवा असतां कामाची नाहीं. आपण संततीकरितां संग करतों असें

जर ते सांगूं लागले, तर ते स्वतःला आणि जगाला फसवीत आहेत. कोणत्याहि विषयाची छाननी करतेवेळीं प्रामाणिकपणा हा नेहमीं गृहीतच धरलेला असतो. संगापासून मिळणारें सुख दडविण्याकरितां संततीच्या इच्छेचें ढोंग करूं नये.

हरिजन : २४-४-१९३७

---

## खरें असेल तर कौतुकास्पद : : १

सकाळीं–संध्याकाळीं फिरत असतांना खानसाहेब अबदुल गफारखान आणि मी सर्वसाधारण विषयांवर नेहमीं बोलतों. काबुल आणि त्याच्या पलीकडील भागापर्यंत सरहद्दीवरील प्रदेशांत ते फिरलेले असल्यामुळें आणि सरहद्दीवरील पहाडी जातींना ते ओळखीत असल्यामुळें या साध्या लोकांच्या संवयी आणि चालीरीती ते पुष्कळ वेळां मला वर्णन करून सांगतात. या पहाडी टोळ्यांतील लोकांना जिला ‘ आधुनिक संस्कृति ’ म्हणतात, तिचा स्पर्शहि झालेला नाहीं. हे लोक मुख्यतः मक्याच्या किंवा सातूच्या भाकरीवर आणि मसूरांवर राहातात. मसूरांच्या जोडीला केव्हां केव्हां ताकहि असतें. त्यांना मांस मिळतें पण फार क्वचित्. उघड्यावरची राहणी आणि जीवनदायी हवा हेंच त्यांच्या सुप्रसिद्ध काटकपणाचें कारण असलें पाहिजे असें मीं म्हटलें. लगेच खानसाहेब म्हणाले, “तेवढेंच नाहीं. त्यांच्या शक्तीचें रहस्य त्यांच्या निष्कलंक जीवनांत आहे. स्त्रिया आणि पुरुष दोघेहि पूर्ण वयांत आल्यानंतरच लग्नें करतात. बेइमानी, परदारागमन किंवा विवाहपूर्व प्रेम हें तेथें कुणाला जवळ जवळ माहीतच नाहीं. लग्न न होतां कोणी संग केला, तर त्याला देहांताची

शिक्षा आहे. ज्या कोणाचो अशी नुकसानी झाली असेल,त्या मनुष्याला पापी मनुष्याचा प्राण घेण्याचा हक्क आहे."

खानसाहेब सांगतात तसेच सर्व लोक जर शुद्ध असतील, तर आपण हिंदुस्थानांतील लोकांनीं आत्मसात् करावा असा हा धडा आहे. मीं खानसाहेबांना म्हटलें, "पहाडी टोळयांची शरीरप्रकृति इतकी सुंदर आहे याचें कारण जर त्यांचें ब्रह्मचर्यच असेल, तर त्यांच्यांत मनाचें आणि शरीराचें परस्परांशीं संपूर्ण सहकार्य असलें पाहिजे. कारण मन जर इंद्रियवृत्तीसाठीं आसावलेलें असेल आणि शरीर प्रतिबंध करीत असेल, तर वीर्याचा प्रचंड प्रमाणावर अपव्यय होतो आणि त्यामुळें शरीर अगदीं श्रांत होऊन जातें." खानसाहेबांना माझें हें अनुमान बरोबर वाटलें. ते म्हणाले, "मला जें निरीक्षण करून भासलें तें असें कीं, लग्न झालें नसलें तर ब्रह्मचर्य पाळण्याचा या टोळयांतील लोकांना इतका सराव झाला आहे कीं, लग्नाव्यतिरिक्त संग-सुख भोगावें अशी इच्छाच तिकडील तरुण स्त्रीपुरुषांना कधीं होत नाहींसें दिसतें.' या प्रदेशांतील स्त्रिया कधींहि पडदा पाळीत नाहींत, खोटी लाजलज्जा तेथें नाहीं, स्त्रिया निर्भय असतात. त्या वाटेल तिकडे मोकळेपणानें हिंडू–फिरूं शकतात, स्वतःचें आणि स्वतःच्या शीलाचें रक्षण करण्याला त्या चांगल्या समर्थ असतात, त्यासाठीं त्यांना पुरुषांच्या छायाछत्राची जरूर भासत नाहीं, असेंहि खानसाहेबांनीं सांगितलें.

पण खानसाहेबांनीं हें कबूल केलें कीं, हें ब्रम्हचर्य बुद्धीवर किंवा ज्ञानमय श्रद्धेवर आधारलेलें नसल्यामुळें सुधारलेल्या किंवा मिळमिळीत आयुष्यक्रमाच्या सहवासांत जेव्हां हे पहाडी स्त्रीपुरुष येतात आणि या आयुष्यक्रमांत रूढीला फांटा दिला असतां शिक्षा होत नाहीं व बेइमानी किंवा व्यभिचार याकडे लोकमत उपेक्षा दर्शवितें असें जेव्हां ते पहातात, तेव्हां हें त्यांचें ब्रह्मचर्य भंग पावतें. या गोष्टीवर पुष्कळ विचार उत्पन्न

होतात; पण त्यांचा मी येथें ऊहापोह करीत नाहीं. हें आज लिहिण्याचा माझा उद्देश हा आहे कीं, वरील गोष्टी सत्य आहेत का हें नाहींत पडताळून पहावें आणि खानसाहेब जसे या पहाडी लोकांना ओळखतात, तसे आणखी जे कोणी त्यांना ओळखत असतील त्यांच्याकडून याविषयीं अधिक माहिती मिळवावी. याचबरोबर हिंदुस्थानांतील तरुण स्त्रीपुरुषांनाहि मला हें सुचवायचें आहे कीं, ब्रम्हचर्याचें पालन जर या पहाडी लोकांना खरोखर स्वाभाविक असेल—आणि खानसाहेब म्हणतात तें तसें आहे—तर आम्ही आमच्या मनःसृष्टींत योग्य विचारांनाच नांदूं दिलें आणि आगंतुक विचारांना शिरकाव करूं दिला नाहीं, तर आम्हांलाहि तें तितकेंच स्वाभाविक व्हावें. खरोखर, जर योग्य विचारच जास्त प्रमाणांत स्थिर झाले, तर आगतुंक विचारांना आंत जागाच मिळणार नाहीं, यांत शंका नाहीं. अशी मानसिक प्रवृत्ति बनविण्याला धैर्य लागतें. कच्च्या दिलाच्या लोकांना संयम कधींच साध्य होत नाहीं. प्रार्थना आणि उपवास यांच्या रूपानें सतत केलेल्या प्रयत्नाला व सावधगिरीलाच असें सुंदर फळ येतें. प्रार्थना म्हणजे पोपटपंची नव्हे, किंवा उपवास म्हणजे शरीराची निव्वळ उपासमार नव्हे. श्रद्धापूर्वक ईश्वराला ओळखणाऱ्या हृदयापासून बाहेर पडते तो प्रार्थना. आणि उपवास म्हणजे पापी किंवा हानिकारक विचारापासून, आचारापासून किंवा अन्नापासून संयमन. मन तऱ्हतऱ्हेच्या पक्वान्नांचा विचार करीत आहे आणि शरीर मात्र उपास करीत आहे ही स्थिति अगदींच घाणेरडी आहे.

हरिजन : १०-४-१९३७

# स्वैरसंबंधाकडे धांव : : १०

एक तरुण गृहस्थ लिहितात:

" जगांत बदल घडवून आणण्यासाठीं प्रत्येकानें नीतिमान् व्हावें असें आपण म्हणतां. नीतीचा अर्थ आपण काय करतां हें निश्चितपणें मला माहीत नाहीं. म्हणजे आपण लैंगिक बाबींपुरतीच तिला मर्यादित करतां कीं मानवी आचाराच्या सर्व क्षेत्रभर तिची व्याप्ति मानतां ? लैंगिक बाबींपुरतीच तिची व्याप्ति आपण मानीत असाल असा मला संशय येतो. कारण आपले भांडवलवाले आणि जमीनदार मित्र आपल्या मजुरांच्या आणि कुळांच्या जिवावर प्रचंड नफा उकळून अन्याय आणि पाप करीत आहेत त्यांकडे कांहीं आपण त्यांचें लक्ष वेधीत नाहीं; आणि इकडे लैंगिक बाबतींत तरुण स्त्रीपुरुषांच्या हातून घडणाऱ्या नैतिक स्खलनाबद्दल त्यांच्यावर कोरडे ओढण्याचा आणि ब्रह्मचर्याचें त्यांच्यापुढें गुणगान करण्याचा मात्र आपल्याला कधीं कंटाळा येत नाहीं. हिंदुस्थानांतील तरुणांचें अंतःकरण ओळखीत असल्याचें आपण सांगतां. मी कांहीं कुणाचा प्रतिनिधि म्हणून बोलत नाहीं; पण एकटा एक तरुण म्हणून आपलें हें म्हणणें खोटें आहे असें नम्रपणें सांगूं इच्छितों. आजकालचा मध्यम-वर्गांतील तरुण कोणत्या वातावरणांतून जात आहे हें आपल्याला माहीत असावेंसें दिसत नाहीं; वर्षानुवर्षें ती जखडलेली बेकारी, चिरडून टाकणाऱ्या त्या सामाजिक रूढी आणि परंपरा, आणि सहशिक्षणापासून उत्पन्न होणारे ते मोह ! हा सारा जुन्या आणि नव्या आदर्शांचा संघर्ष आहे आणि याचा नेहमीं घडणारा परिणाम म्हणजे तरुणांची पराभूत आणि दीन दशा. तरुणांच्याकडे आपण सहृदयतेनें, अनुकंपेनें पहावें आणि नीतिविषयींच्या आपल्या सोंवळ्या आदर्शांना पुढें ठेवून त्यांच्याविषयीं मत बनवूं नये अशी माझी आपल्याला नम्र

विनंति आहे. मला वाटतें, शेवटीं कोणतीहि कृति जेव्हां एकमेकांच्या संमतीनें आणि एकमेकांविषयींच्या प्रेमानें केली जाते, तेव्हां ती नीतीला धरूनच असते; मग ती लग्नविधींत बसो अथवा न बसो. कृत्रिम साधनांचा शोध लागल्यापासून तर विवाहसंस्थेचा कामविषयक पायाच उखडून टाकला गेला आहे. ती संस्था आतां प्रामुख्येंकरून संततीचें संरक्षण आणि संगोपन करणारीच बनली आहे. या कल्पनांनीं कदाचित् आपल्याला धक्काच बसेल! आजकालच्या तरुणांविषयीं मत बांधतांना आपण आपलें स्वतःचें तरुणपण विसरूं नये, असें आपल्याला सुचविण्याचें मी धारिष्ट करतों. आपण अनावर कामवासनेनें भारलेले असे गृहस्थ होतां, अमर्याद स्वैराचाराला आपण विकलेले होतां, आणि त्याच मुळें आपल्यामध्यें स्त्रीपुरुष--संगाविषयीं आतां एक प्रकारची किळस उत्पन्न झाली असावीसें दिसतें. तरीच ही आपल्यामध्यें विरक्ति आणि पापशंका उत्पन्न झाली आहे. आपल्याशीं तुलना करतां माझ्या मतें आजकालचे तरुण याबाबतींत आपल्यापेक्षां पुष्कळच बरे म्हटले पाहिजेत."

एका नमुनेदार पत्रांतील हा उतारा आहे.

गेले तीन महिने सदर पत्रलेखकाशीं माझा परिचय आहे. तेवढ्या अवधींतसुद्धां माझ्या माहितीप्रमाणें, तो कितीएक स्थित्यंतरांमधून पसार झाला आहे. आजसुद्धां तो कसोटीच्या प्रसंगांतून जात आहे. वरील उतारा त्याच्या एका लांबलचक पत्रांतून दिला आहे. हें आणि इतर अशींच त्याचीं पत्रें प्रसिद्ध करण्याला तो मला खुषीनें परवानगी देईल. पण जेवढा भाग मीं दिला आहे, तेवढा पुष्कळशा तरुणांची वृत्ति काय आहे हें दाखविण्याला पुरेसा आहे.

तरुण स्त्रीपुरुषांविषयीं मला निःसंशय संपूर्ण सहानुभूति आहे. माझ्या तरुणपणच्या दिवसांची मला स्पष्ट आठवण आहे. आणि माझा या देशाच्या

तरुणवर्गावर विश्वास असल्यामुळेंच त्यांच्यापुढे जे महान् प्रश्न आज उभे राहिले आहेत, त्या प्रश्नांचा विचार करण्याचा मला कधीं कंटाळा येत नाहीं.

आचार-धर्मालाच केव्हां नीतिशास्त्र म्हणतात, केव्हां धर्मशास्त्र म्हणतात. धर्माशीं संबंध नसलेलें नैतिक जीवन म्हणजे वाळूवरील इमला होय. आणि नीतीपासून वेगळा काढलेला धर्म म्हणजे नाद करणारी घंटाच होय. तिचा उपयोग फक्त गिल्ला करणें आणि डोकीं फोडणें एवढ्यासाठींच व्हावयाचा. नीतीमध्यें सत्य, अहिंसा व ब्रह्मचर्य यांचा अंतर्भाव होतोच. आजपर्यंत मानवानें आचरणांत आणलेल्या प्रत्येक सद्गुणाचा या तीन मूलभूत सद्गुणांशीं संबंध आहे आणि या तिन्ही-मधूनच प्रत्येकाची उत्पत्ति आहे. अहिंसा आणि ब्रह्मचर्य हें पुनः सत्या-मधून निर्माण होणारे आहेत; आणि सत्य म्हणजे माझ्या दृष्टीनें परमेश्वर.

ब्रह्मचर्याच्या अभावीं स्त्रिया किंवा पुरुष दीन बनतात. इंद्रियांवर ताबा नसणें म्हणजे सुकाणूं नसलेल्या जहाजांत बसण्यासारखें आहे. जो पहिला खडक भेटेल, त्यावर आपटून त्या जहाजाचा चक्काचूरच व्हावयाचा. म्हणूनच ब्रह्मचर्याविषयीं माझा एवढा एकसारखा आग्रह. कृत्रिम साधनें दाखल झाल्यापासून स्त्री-पुरुष-संबंधांविषयींच्या कल्पना बदलून गेल्या आहेत असें पत्रलेखक म्हणतो तें वस्तुतः खरें आहे. लग्न-संबंध झाला काय किंवा न झाला काय, दोघांची संमति असली म्हणजे समागम हा नीतियुक्त आहे; मग हीच तर्कबुद्धि पुढें चालवून त्या दोन व्यक्ती एकाच लिंगाच्या असल्या तरी हरकत नाहीं असें जर झालें, तर कामविषयक नीतिमत्तेचा संबंध पायाच ढांसळून पडला म्हणावयाचा ! मग या देशाच्या तरुणांना दैन्य आणि पराभव यावांचून गति काय ? संभोगाच्या लालसेच्या पंजांत सांपडलेले असे पुष्कळ तरुण स्त्रीपुरुष हिंदुस्थानांत आहेत, कीं ज्यांना त्या लालसेपासून मुक्त होण्यांत आनंद वाटेल. मनुष्याला गुलाम करून टाकणाऱ्या आजपर्यंतच्या कोणत्याहि

मादक पदार्थांपेक्षां ही लालसा अधिक जबरदस्त आहे. कृत्रिम साधनांचा उपयोग फक्त संतति-नियमनापुरताच मर्यादित करण्यांत येईल अशी आशा करणें व्यर्थ आहे.

बहुमोल अशा जीवाची धारणा करण्याशींच समागमाचा निश्चितपणें संबंध जोडला गेला, तरच जीवन निर्दोष होण्याची आशा आहे. अर्थात् विकृत अशा कामभावनेचा विचार मग समूळच नष्ट होतो आणि स्वैर-संबंधाचा विचारहि कांहीं अंशीं बाजूला पडतो.

स्त्री-पुरुष-संगाला त्यांच्या नैसर्गिक होणाऱ्या परिणामापासून वेगळें काढलें कीं बीभत्स अशा स्वैरसंबंधाला वाव मिळालाच; आणि अनैसर्गिक दुष्ट संवयीला उचलून नाहीं धरलेंत तरी तिच्याकडे जाणुनबुजून दुर्लक्ष झालेंच म्हणून समजावें.

स्त्री-पुरुष-प्रश्नाच्या विचाराशीं माझे स्वतःचे अनुभव प्रस्तुत असल्यामुळें माझ्या आत्मचरित्रांतील प्रकरणें ज्यांनीं वाचलेलीं नाहींत अशा वाचकांनीं, माझ्या हातून यथेष्ट कामोपभोगाचें पाप घडलें असा जो निष्कर्ष वरील पत्र-लेखकानें काढला आहे, तसा निष्कर्ष काढूं नये, अशी जातां जातां त्यांना सूचना द्यावीशी वाटते. माझ्या हातून जो कांहीं फाजिल स्वैराचार घडला असेल, तो फक्त माझ्या पत्नीपुरताच मर्यादित होता. आणि मी एका मोठ्या संयुक्त कुटुंबांत राहात असल्याकारणानें रात्रींच्या कांहीं थोड्या घटकांव्यतिरिक्त एकांताला आम्हांला वावच नव्हता. इंद्रिय-लालसेकरितांच स्वैराचार करण्याच्या मूर्खपणाची जाणीव मी तेवीस वर्षांचा होतों तरीसुद्धां माझ्यांत उत्पन्न झाली आणि संपूर्णपणें ब्रह्मचर्य पाळण्याचा निश्चय मीं १८९९ मध्यें, म्हणजे मीं तीस वर्षांचा असतांना केला. मला यती म्हणणें चुकीचें आहे. ज्या आदर्शांनीं माझें जीवित नियमित केलें आहे ते आदर्श सर्वसाधारण मानवसमाजानें स्वीकारावेत यासाठीं पुढें ठेवले आहेत. हळुहळू उत्क्रांत होत होत मी या आदर्शांपर्यंत पोचलों आहें. प्रत्येक पाऊल पुरा विचार करून मनांत

चांगल्या रीतीनें तोलून मापून, आणि मागचापुढचा विचार लक्षांत घेऊन टाकलें आहे. माझें ब्रह्मचर्य आणि माझी अहिंसा हीं माझ्या स्वतःच्या अनुभवांतून निघालीं होतीं आणि सार्वजनिक कर्तव्याच्या दृष्टीनें तीं आवश्यक होऊन बसलीं. दक्षिण आफ्रिकेंत गृहस्थ म्हणून काय, वकील म्हणून काय, सामाजिक सुधारक म्हणून काय, किंवा राजकीय कार्यकर्ता म्हणून काय, जें तुटक आयुष्य मला घालवावें लागलें, त्यायोगें या कर्तव्यांच्या योग्य पूर्ततेकरितां म्हणून, कामविषयक जीवनाचें अत्यंत कडकपणें नियमन करणें आणि मानवी व्यवहारांत अहिंसेचा आणि सत्याचा दृढ आचार करणें– मग ते व्यवहार माझ्या देशबांधवांशीं असोत किंवा युरोपियांशीं असोत–आवश्यक झालें. सर्वसाधारण माणसाला जी सर्वसाधारण बुद्धि–शक्ति असते त्याहून मी कांहीं जास्त आहे असें मी मुळींच मानीत नाहीं. किंवा बऱ्याच कष्टाच्या संशोधनानंतर ज्या अहिंसेप्रत किंवा ब्रह्मचर्याप्रत पोंचणें मला शक्य झालें, तेवढी अहिंसा किंवा ब्रह्मचर्य पाळण्याकरितां माझ्यांत कांहीं विशेष योग्यता आहे असेंहि मी मानीत नाहीं. कोणीहि स्त्री किंवा पुरुष माझ्यासारखाच प्रयत्न करील आणि माझ्यासारखीच श्रद्धा व आशा मनांत बाणवून घेईल, तर तिला वा त्याला, जें मला प्राप्त झालें आहे तें प्राप्त करून घेतां येईल, यांत मला काडीमात्र शंका वाटत नाहीं. श्रद्धाविरहित कार्य म्हणजे तळ नसलेल्या खड्ड्याचा तळ गांठण्याचा प्रयत्न करण्यासारखेंच होय.

हरिजन : ३।१०।१९३६

---

## एक त्याग : : ११

१८९१ सालीं इंग्लंडहून परतल्यानंतर मीं घरचीं मुलें जवळजवळ माझ्याच ताब्यांत घेतलीं आणि या मुलांमुलींनाच बरोबर घेऊन त्यांच्या खांद्यांवर हात टाकून फिरायला जाण्याचा प्रघात पाडला. हीं माझ्या बंधूंचीं मुलें होतीं. तीं मुलें पुढें मोठीं झालीं तरीसुद्धां माझी ही संवय चालूच राहिली. कुटुंब जसें वाढलें तसें माझें या संवयीचें प्रमाणहि वाढलें. इतकें कीं, त्याकडे लोकांचें लक्ष जाऊं लागलें.

मला स्मरण आहे तेथवर, मी यांत कांहीं चूक करीत आहें, अशी जाणीव मला नव्हती. पण कांहीं वर्षांपूर्वी साबरमतीला एका आश्रमवासी-यानें सांगितलें कीं, तुमचें हें करणें जेव्हां तरुण मुली आणि स्त्रिया यांच्याहि बाबतींत घडतें तेव्हां समाजाच्या चालू सद्‌भिरुचीला त्यामुळें धक्का बसतो! तथापि आश्रमवासींयांशीं या बाबतींत मी चर्चा केली आणि ही माझी कृति चालूच राहिली. परवां वर्ध्याला माझे दोन सहकारी आले होते. त्यांनीं या संवयीनें इतरांना वाईट उदाहरण घालून दिल्या-सारखें होईल आणि म्हणून मीं तसें करण्याचें सोडून द्यावें, असें मला सुचविलें. त्यांचा युक्तिवाद कांहीं मला पटला नाहीं. तथापि, त्या मित्रांची सूचना बाजूला सारावी असेंहि मला वाटलें नाहीं. म्हणून मीं ही बाब पांच आश्रमवासीयांच्यापुढें तपासणी करून सल्ला देण्यासाठीं ठेवली. या कामाला स्वरूप येत चाललें होतें, एवढ्यांत एक निर्णायक प्रसंग घडला. माझ्या नजरेस असें आणून देण्यांत आलें कीं, एक बुद्धिमान कॉलेज-विद्यार्थी, जिच्यावर त्याचा प्रभाव आहे अशा एका मुलीशीं एकांतांत स्वैर स्वातंत्र्यानें वागतो. आपलें तिच्यावर बहिणीसारखें प्रेम आहे आणि हें प्रेम कांहींना कांहीं प्रत्यक्ष शारीरिक कृतींत उतरविल्यावांचून मला राहवत नाहीं, अशी सबब तो सांगतो. यांत यत्किंचित्सुद्धां अशुद्धता

असल्याची कल्पनाहि त्याला सहन होत नाहीं. हा तरुण काय काय करीत होता याचा जर मीं निर्देश केला, तर त्याची ही मोकळेपणाची वागणूक अशुद्ध होती असें वाचकच ताबडतोब म्हणतील. पत्रव्यवहार पाहिल्यानंतर मीं व ज्यांनीं तो पत्रव्यवहार वाचला आहे ते अशा निर्णयावर आलों कीं, हा तरुण पक्का ढोंगी तरी असला पाहिजे एक, किंवा स्वतःची फसवणूक तरी करून घेत असला पाहिजे.

असो. पण ही गोष्ट बाहेर आल्यानें मी विचारप्रवृत्त झालों. माझ्या त्या दोन सहकाऱ्यांनीं दिलेल्या पूर्वसूचनेची मला आठवण झाली आणि आपल्या बचावासाठीं तो तरुण माझ्या या कृतीचा दाखला देत आहे असें जर मला आढळून आलें, तर मला काय वाटेल असा मीं स्वतः-लाच प्रश्न केला. येथें हें नमूद करावेसें वाटतें कीं, त्या तरुणाच्या प्रेम-लीलांचें स्थान बनलेल्या त्या मुलीला जरी तो सर्वस्वीं शुद्धांतःकरणी आणि अगदीं भावाप्रमाणें वागणारा वाटतो, तरी त्याच्या या लीला तिला मुळींच आवडत नाहींत. ती आढेवेढेहि घेते, पण त्याचा प्रतिकार करण्याची तिच्या अंगीं शक्ति नाहीं. या प्रसंगानें मला आत्मनिरीक्षण करायला लावलें आणि तो पत्रव्यवहार वाचल्यानंतर दोनतीन दिव-सांच्या आंतच मीं माझ्या संवयीचा त्याग करण्याचा निर्णय केला. आणि १२ तारखेला मी वर्धा आश्रमांतील मंडळींना तें जाहीर केलें. हा निर्णय करतांना मला थोडीथोडकी व्यथा नाहीं झाली. मी करीत असलेल्या कृतीमुळें किंवा ती करीत असलेल्या मुद्दतींत अशुद्ध विचारांचा लवलेशहि माझ्या चित्तांत कधीं शिरला नव्हता. माझें वर्तन नेहमीं उघडें राहिलें आहे. एकाद्या बापानें मुलांशीं वागावें,तशी ही माझी कृति होती आणि त्यामुळें माझ्या देखरेखीखालीं व पालकत्वाखालीं अस-लेल्या कितीतरी मुलींना आपलें अंतःकरण माझ्यापुढें उघडें करण्याची हिंमत आली होती. इतका विश्वास कदाचित् दुसऱ्या कोणीहि संपादन केला नसेल, असें मला वाटतें.

ज्या ब्रह्मचर्याच्या रक्षणासाठीं विरुद्ध लिंगाच्या व्यक्तीचा स्पर्शहि होऊं नये असा कोट उभा करण्याची सदोदित गरज पडते, आणि जें ब्रह्मचर्य यत्किंचित् मोहामुळेंसुद्धां चलित होतें अशा ब्रह्मचर्यावर माझा विश्वास नसला, तरीहि मी ज्या मोकळेपणानें वागलों तशा मोकळेपणांत धोके आंहेत, याची मला कल्पना नाहीं असें नाहीं.

त्यामुळें मीं वर उल्लेखिलेली गोष्ट उघड झाल्यानें, माझी वर्तणूक मुळांत कितीहि शुद्ध असली तरी तिचा त्याग करणेंच बरें, असें मला वाटलें. माझ्या प्रत्येक कृतीची हजारों स्त्रीपुरुष चिकित्सा करतात. कारण मी एक प्रयोग चालवीत आहे आणि त्या प्रयोगाला अखंड सावधानतेची गरज आहे. अमुक गोष्ट मी अशा कारणांसाठीं करतों अशा तऱ्हेचा सयुक्तिक बचाव ज्यांच्या बाबतींत मला द्यावा लागेल अशा गोष्टी करण्याचें मीं टाळलेंच पाहिजे. कोणी वाटेल त्यांनीं माझें या बाबतींत अनुकरण करावें अशी माझी कधींहि इच्छा नव्हती. त्या तरुणाचें उदाहरण म्हणजे मला ताकीदच आहे. मीं ती ताकीद ध्यानांत घेतली आहे ती अशा आशेनें कीं, ज्या कोणाच्या हातून माझें उदाहरण पुढें ठेवून किंवा तद्व्यतिरिक्त अशा चुका झाल्या असतील, ते माझ्या या त्यागानें योग्य मार्गावर येतील. निष्पाप तारुण्य हा एक बहुमोल ठेवा आहे; क्षणिक उद्दीपनाकरितां—ज्याला चुकीनें सुख म्हटलें जातें त्याकरितां—तो ठेवा हवा तसा उधळून टाकला जाऊं नये. या कहाणींत उल्लेखिलेल्या मुलीसारख्या दुर्बळ मुलींनीं तरुणांची लगट—मग ती कितीहि निष्पाप म्हणून सांगितली जावो—तिचा प्रतिकार करण्याइतकें सबळ व्हावें. हें तरुण एक तर लंफंगे असतात, किंवा त्यांना आपण काय करतों हें समजत नाहीं.

हरिजन: २१।९।१९३५

# ईश्वरी कृपेवांचून कांहीं नाहीं : : १२

डॉक्टर-मित्रांच्या आणि सरदार वल्लभभाई व जमनालालजी या स्वयंभू जेलरांच्या कृपेनें, प्रयोग म्हणून 'हरिजन' च्या वाचकांशीं कांहीं मर्यादित प्रमाणांत मी पुनः संभाषण सुरू करूं शकत आहें. तूर्त निदान अगदीं अत्यावश्यक वाटेल त्याखेरीज मीं 'हरिजन' मध्यें लिहूं नये, आणि लिहावयाचें त्यांतसुद्धां आठवड्यांतून कांहीं तासांपेक्षां अधिक वेळ देऊं नये, अशा त्यांनीं माझ्या स्वातंत्र्याला मर्यादा घातल्या आहेत आणि मीं त्या मान्य केल्या आहेत. पत्रलेखकांच्या वैयक्तिक प्रश्नांशीं किंवा घरगुती अडचणींशीं संबंध असणारा खाजगी पत्र-व्यवहार मी चालविणार नाहीं. मात्र ज्यांत मी स्वतः अगोदरच गुंतलों आहें तो मला चालविलाच पाहिजे. सार्वजनिक कामें अंगावर घेणार नाहीं किंवा सार्वजनिक सभांना हजर राहाणार नाहीं अथवा बोलणार नाहीं. झोंप, करमणूक, व्यायाम, आणि अन्न, याबाबतींत मला सक्त सूचना दिल्या गेल्या आहेत. त्यांच्याशीं वाचकांचा कांहीं संबंध नसल्यामुळें त्यांचा मी उल्लेख करीत नाहीं. 'हरिजन' चे वाचक आणि पत्रलेखक माझ्याशीं आणि महादेव देसाई यांच्याशीं हे नियम पाळ-ण्याच्या बाबतींत सहकार्य करतील अशी मी आशा करतों; कारण, महादेवला मुख्यतः माझा सर्व पत्रव्यवहार संभाळायचा असतो.

माझी प्रकृति बिघडली त्याचें मूळ कारण आणि त्यावर केलेली उपाययोजना याविषयींची थोडीशी माहिती समजून घेणें वाचकाला मनोरंजक वाटेल. डॉक्टर-मित्रांचें म्हणणें जेवढें मला समजलें आहे त्या-वरून, अत्यंत काळजीपूर्वक आणि कसोशीनें माझ्या शरीराची तपासणी केल्यानंतर त्यांनीं माझ्या कोणत्याहि अवयवांत बिघाड झाल्याचें

आढळलें नाहीं. त्यांचें मन असें कीं प्रोटीन्स आणि साखर, व पिष्ठमय पदार्थांच्या रूपांत असणारीं कार्बो हायड्रेट्स् यांच्या उणीवेमुळें माझी प्रकृति ढासळली, यांतच पुनः रोजचें सार्वजनिक सेवाकार्य उरकण्या-व्यतिरिक्त डोक्याला शीण देणाऱ्या अनेक खाजगी प्रश्नांवर पुष्कळ वेळ चर्चा आणि चिंतन करण्याचा बरेच दिवस पडलेला ताण यांची भर पडली. माझ्या स्मरणाप्रमाणें गेले बारा किंवा अधिक महिने माझी तक्रार चालूच आहे कीं रोज वाढत जाणाऱ्या कामाला जर मीं आळा घातला नाहीं. तर एकदां केव्हांतरी प्रकृति ढांसळणार. त्यामुळें जेव्हां ती बिघडली तेव्हां मला आश्चर्य वाटलें नाहीं. आणि जगाला ही गोष्ट कळण्याचा फारसा संभव नव्हता. पण माझी अवास्तव चिंता करणाऱ्या माझ्या एका मित्रानें थोडासा बिघाड दिसतांच त्या-संबंधीं जमनालालजींना खळबळ उडवून देणारी चिठ्ठी लिहिली. जमना-लालजींनीं वर्ध्यांत मिळणाऱ्या सर्व डॉक्टरांना गोळा केलें आणि आणखी मदतीकरितां नागपूरला व मुंबईला निरोप धाडले.

ज्या दिवशीं माझी प्रकृति ढांसळली त्यादिवशीं सकाळीं उठल्या-बरोबर मानेपाशीं कांहींतरी विशेष कळ येत असल्याची पूर्वसूचना मला मिळाली होतीच. पण मीं त्याकडे फारसें लक्ष दिलें नाहीं, किंवा कोणाला त्यासंबंधीं कांहीं बोललोंहि नाहीं. तसाच मी रोजच्या कार्यक्रमाला लागलों. रोजच्याप्रमाणें संध्याकाळचें फिरणें चालू असतांना एका मित्राशीं जें संभाषण झालें, तें अत्यंत गंभीर आणि थकवून सोडणारें होतें. तो शेवटचा आघात ठरला. अगोदरच आदल्या पंधरवड्यांत कांहीं मोठ्या आणि महत्त्वाच्या प्रश्नांच्या विचारांत व निकालांत माझ्या ज्ञान-तंतूंवर खूप ताण पडला होता, आणि ते प्रश्न तर मला स्वराज्याच्या सार्वभौम प्रश्नाइतकेच मोठे व महत्त्वाचे होते.

माझ्या प्रकृतीच्या बिघाडाच्या बाबतींत गाजावाजा आणि धांदल केली गेली नसती, तरी निसर्गाकडून निक्षून मिळालेली ताकीद मीं मान्य

केलीच असती. योग्य तितकी विश्रांती घेतली असती आणि या आपत्तींतून निभावलों असतों. पण गत कालाकडे दृष्टि फेकतांना, मला वाटतें धांदल केली तें ठीकच झालें. डॉक्टर-मित्रांनीं विशेष काळजी घेण्यास सांगितल्यामुळें आणि या दोघां जेलरांनीं तितकीच दक्षता घेतल्यामुळें आवश्यक तितकी विश्रांती मला घेणेंच भाग पडलें. एरवीं मीं तशी घेतली नसती. त्यामुळें मला अंतर्निरीक्षण करण्याला पुष्कळ वेळ मिळाला. या निरीक्षणाचा मला लाभ झाला. इतकेंच नव्हे, तर मला गीता जशी समजली आहे, तशा तिच्या अर्थाचें अनुसरण करतांना माझ्या हातून होणाऱ्या गंभीर दोषांचेंहि त्यामुळें मला दर्शन झालें. माझ्यापुढें निकालासाठीं आलेल्या असंख्य प्रश्नांचा मीं योग्य तितक्या अनासक्तिपूर्वक विचार केला नाहीं असें मला आढळून आलें. त्यांपैकीं पुष्कळ प्रश्नांवर माझें चित्त चिकटलें आणि त्यामुळें माझ्या भावना मीं उत्तेजित होऊं दिल्या. आणि अशा रीतीनें त्याचा माझ्या ज्ञानतंतूंवर परिणाम झाला, हें उघडच आहे. दुसऱ्या शब्दांत सांगायचें तर, गीताभक्ताच्या बाबतींत व्हायला पाहिजे त्याप्रमाणें, त्यांच्यापासून माझें शरीर आणि मन अस्पृष्ट राहिलें नाहीं. गीतामातेच्या शिकवणुकीप्रमाणें जो अक्षरशः चालतो, त्याचें मन जरठ होण्याचें कारणच नाहीं, अशी माझी दृढ श्रद्धा आहे. अशा मनुष्याचा देह कालानुक्रमानें एकाद्या निरोगी वृक्षाच्या पानांप्रमाणें सुकून जाईल, त्याचें मन मात्र सदोदित तरुण आणि ताजें राहील. भीष्माचार्यांनीं मृत्युशय्येवर असतांना सुद्धां युधिष्ठिराला दिव्य उपदेश देणें याचा हाच अर्थ मी समजतों. आजुबाजूला घडणाऱ्या कोणत्याहि प्रसंगांनी मन भडकूं देऊं नका किंवा मनावर परिणाम होऊं देऊं नका, अशी डॉक्टर-मित्रांची मला सारखी ताकीद असावयाची. दुःखद स्वरूपाच्या बातम्या मला पोंचूं नयेत अशासाठीं विशेष काळजी घेण्यांत आली होती. त्यांच्या इतक्या बंदोबस्तावरून मी अगदींच कमकुवत गीताभक्त आहें असें वाटणें साहाजिक आहे.मी स्वतःला जरी

तसा समजत नसलों, तरी या बंदोबस्तामागें कांहीं अर्थ होता यांत शंका नाहीं. कारण मीं मगनवाडींहून महिलाश्रमांत जावें या जमनालालजींच्या सूचनेचा मीं किती अंतःकरण पिळवटून स्वीकार केला तें मला समजून आलें. कांहीं कां असेना, अनासक्त कर्माच्या बाबतींत माझी त्यांच्याजवळ पत राहिली नाहीं हें खरें. माझी अनासक्ततेची फुशारकी व्यर्थ आहे हें सिद्ध करणारा पुरावा माझी प्रकृति ढासळल्यामुळें त्यांच्याजवळ भरपूर होता. या धिक्काराला मी सर्वथैव पात्र होतों हें मी कबूल करतों.

पण याहूनहि अत्यंत गलिच्छ गोष्ट याच्या मागोमाग घडावयाची होती. १८९९ सालापासून जाणुनबुजून आणि जागरूक राहून मी ब्रह्मचर्य पाळण्याचा प्रयत्न करीत आलों आहे. केवळ शारीरिक पावित्र्यच नव्हे, तर वाचिक आणि मानासिक पावित्र्यसुद्धां ब्रह्मचर्यांत येतें अशी माझी ब्रह्मचर्याची व्याख्या आहे. छत्तीसांहून आधिक वर्षें जागरूकपणें तसा माझा प्रयत्न चालू असतांना, फक्त एकदांच दोष घडला. तो अपवाद म्हणून सोडला, तर विकारयुक्त खळबळ माझ्या मनांत उत्पन्न झाल्याचें एकहि उदाहरण घडलेलें नाहीं. पण तसें या आजारांत मात्र घडलें. मला स्वतःची किळस आली. मनांत तशी भावना उद्भूत होतांच माझी शुश्रूषा करणाऱ्यांना आणि डॉक्टर-मित्रांना मीं माझ्या स्थितीची जाणीव करून दिली. ते मला काय मदत करणार? मलाहि ती अपेक्षा नव्हती. हा अनुभव आल्यानंतर मात्र माझ्यावर लादण्यांत आलेली विश्रांतीची सक्ति मीं ढिली केली. त्या घाणेरड्या अनुभवाच्या निवेदनानें मला पुष्कळ मोकळेपणा वाटला. मोठें थोरलें ओझें अंगावरून उतरल्यासारखें मला झालें. कांहींहि घात होण्यापूर्वींच माझी शक्ति एकवटण्याचें सामर्थ्य मला त्यामुळें मिळालें. पण मग गीता कुठें गेली? तिची शिकवणूक तर स्पष्ट आणि निःसंदिग्ध आहे. ध्रुवताऱ्याच्या ठिकाणीं जें मन निश्चल झालें, तें मलिनतेपासून सुटलें. त्या ताऱ्यापासून मी किती दूर आहे तें त्यालाच माहीत! दया त्या प्रभूची, कीं महात्मेपणाच्या

फुशारकीनें माझें डोकें कधीं फिरलें नाहीं. पण या सक्तीच्या विश्रांती मुळें पूर्वीं कधींहि झालों नव्हतों इतका मी नम्र झालों. त्यामुळें माझी अपूर्णता आणि माझ्या मर्यादा उघड्या पडल्या. पण मला त्याबद्दल यत्किंचितहि लज्जा वाटत नाहीं. लोकांपासून त्या लपवून ठेवण्याचीच मला लाज वाटली पाहिजे. गीतेच्या संदेशावरील माझी श्रद्धा पूर्वींइतकीच प्रखर आहे. त्या श्रद्धेचें सर्वोच्च अशा अचूक अनुभवांत रूपांतर करण्याकरितां अधिक अविरत प्रयत्नांचें मोल दिलें पाहिजे. हा अनुभव ईश्वरी अनुग्रहावांचून लाभत नाहीं, असें तीच गीता निःसंदिग्धपणें सांगते. ईश्वरानें हा अधिकार सर्वस्वीं आपल्याकडे राखून ठेवला नसता तर आमचीं डोकीं भलीं मोठीं झालीं असतीं.

हरिजन : २९-२-१९३६

---

# अहिंसा कशी काम करते ? : : १३

परवां एक कॉंग्रेस-पुढारी बोलतां बोलतां मला म्हणाले, "गुणाच्या दृष्टीनें १९२०–२५ मध्यें कॉंग्रेस जशी होती तशी आज राहिलेली नाहीं. असें कां व्हावें ? तिच्या गुणांत उणेपणा आलेला आहे. शेंकडा नव्वद् सभासद् कॉंग्रेसची शिस्त पाळीत नाहींत. ही स्थिति पालटण्याकरितां आपण कांहीं करूं शकणार नाहीं कां ?"

हा प्रश्न समयोचित आणि योग्य वेळीं केला गेला आहे. 'मी आतां कॉंग्रेसमध्यें नाहीं' असें म्हणून मी ही जबाबदारी डावलूं शकत नाहीं. कॉंग्रेसची सेवा अधिक चांगल्या रीतीनें करण्याकरितां म्हणूनच मी कॉंग्रेसच्या बाहेर निघालों आहे. कॉंग्रेसच्या धोरणावर अजूनहि माझा प्रभाव आहे हें मी जाणतों. १९२० च्या कॉंग्रेस-घटनेचा कर्ता या

नात्यानें टाळतां येण्याजोगा जो कांहीं बिघाड झाला असेल, त्याला मीं स्वत:लाच जबाबदार धरलें पाहिजे.

१९२० सालीं कॉंग्रेसची सुरवात मुळीं अडचणींतून झाली. सत्य–अहिंसेवर ब्रीद म्हणून फारच थोड्यांचा विश्वास होता. पुष्कळांनीं धोरण म्हणूनच त्यांचा स्वीकार केला होता. तें अपरिहार्य होतें. नव्या धोरणाप्रमाणें चालणाऱ्या कॉंग्रेसच्या कामाचें निरीक्षण केल्यानंतर सभासद सत्य–अहिंसा ब्रीद म्हणून स्वीकारतील अशी मला आशा होती. कांहींजणांनीं तशी स्वीकारली, पुष्कळांनीं स्वीकारली नाहीं. आरंभीं आरंभींच्या अवस्थेंत पहिल्या नंबरच्या पुढाऱ्यांच्या मतांमध्यें कमालीचा बदल घडून आला. ' यंग इंडिया ' मध्यें स्व. पं. मोतीलाल नेहरू आणि देशबंधु दास यांचीं प्रसिद्ध झालेलीं पत्रें वाचकांना आठवतच असतील. आत्मसंयमाच्या, साधेपणाच्या आणि त्यागाच्या जीवनांत त्यांना एक नवीनच आनंद, एक नवीनच आशा, अनुभवाला आली होती. अलीबंधू तर जवळजवळ फकीरच बनले होते. आम्ही दौऱ्यावर होतों तेव्हां या बंधूंमध्यें घडत असलेला फरक पाहून मला मोठा आनंद होत होता. या चार पुढाऱ्यांच्या बाबतींत जें घडलें, तेंच इतरांच्या बाबतींतहि घडलें. त्यांचीं नांवेंहि मी सांगूं शकेन. पुढाऱ्यांचा हा उत्साह सामान्य लोकांतहि शिरला.

पण हा अपूर्व फरक ' एका वर्षांत स्वराज्य ' या जादूमुळें घडून आला होता. या सूत्राची परिपूर्ति होण्याकरितां मीं घातलेल्या अटी मात्र लोक विसरले. ख्वाजासाहेब अब्दुल माजिद तर इतकेंसुद्धां म्हणाले कीं, सत्याग्रह–सेनेचें कारण कॉंग्रेस त्यावेळीं सेनाच बनली होती आणि तशी ती आजहि आहे. फक्त कॉंग्रेसजनांनीं सत्याग्रहाचा अर्थ जाणून घेतला पाहिजे. सेनापति या नात्यानें या अटी पुऱ्या होण्याजोग्या आहेत कीं नाहींत याची खात्री करून घेणें माझें काम होतें. त्यांचें म्हणणें बरोबर असण्याचा संभव आहे. मात्र मला अशा तऱ्हेचें पूर्वज्ञान

झालेलें नव्हतें. मोठ्या प्रमाणावर आणि राजकीय कारणांकरितां अहिंसेचा उपयोग हा माझ्या बाबतींत सुद्धां एक प्रयोगच होता. त्यामुळें मीं आग्रहपूर्वक माझ्या सिद्धांताचें प्रतिपादन करूं शकलों नाहीं. लोकांकडून प्रत्युत्तर कसें काय मिळतें हें पहाण्याकरितां मीं त्या अटी घातलेल्या होत्या. त्या पुऱ्या केल्या अथवा न केल्या तरी हरकत नव्हती. चुका होणें किंवा चुकीचे अंदाज बांधणें नेहमीं संभवनीय होतें. तें कसेंहि असो, स्वराज्याची लढाई जशी लांबली आणि खिलाफतीच्या प्रश्नांतील जिवंतपणा जसा नाहींसा झाला, तसा लोकांचा उत्साह कमी कमी होऊं लागला. धोरण म्हणून ठरविलेल्या अहिंसेवरीलसुद्धां विश्वास डळमळूं लागला आणि असत्य न कळत शिरलें. सत्य-अहिंसा, या जोड गुणांवर किंवा खादीविषयींच्या कलमावर विश्वास नसणारे लोक आंत शिरले, आणि पुष्कळांनीं तर उघडपणें काँग्रेसघटना धाब्यावर बसविली.

हें किल्मिष वाढतच चाललें आहे. तें काढून टाकून काँग्रेसला शुद्ध करण्याचा वर्किंग कमिटी कांहीं प्रयत्न करीत आहे, पण सभासदांची संख्या कमी होण्याचा धोका पत्करूनहि त्याचा बीमोड करणें अजून तिला जमलेलें नाहीं. माझी स्वतःची संख्येपेक्षां गुणावर अधिक श्रद्धा आहे.

तथापि, अहिंसेच्या योजनेंत जबरदस्ती अशी कांहीं वस्तूच नाहीं. बुद्धीपर्यंत आणि हृदयापर्यंत—बुद्धीपेक्षां हृदयापर्यंत—पोंचण्याची आपली शक्ति किती आहे त्यावरच विसंबून राहाणें भाग आहे.

यावरून समजून येतें कीं, सत्याग्रह—सेनापतीच्या शब्दांत सामर्थ्य असलें पाहिजे—अमर्याद शस्त्रांनीं मिळणारें सामर्थ्य नव्हे, तर जीवनाची शुद्धता, सतत जागरूकता, आणि अविश्रांत व्यासंग यांच्यायोगानें निर्माण होणारें सामर्थ्य असलें पाहिजे. ब्रह्मचर्याच्या पालनाशिवाय तें अशक्य आहे. मनुष्याला शक्य तितक्या पूर्ण रीतीनें तें पाळलें पाहिजे. या ठिकाणीं ब्रह्मचर्याचा अर्थ, फक्त जननेंद्रियावर ताबा असा नाहीं.

त्याहून त्याचा अर्थ मोठा आहे. त्याचा अर्थ सर्व इंद्रियांवर संपूर्ण ताबा. या अर्थानें अशुद्ध विचार हा ब्रह्मचर्याचा भंग आहे; त्याचप्रमाणें क्रोध. जीवनाच्या उत्पत्तीला जी वीर्यशक्ति कारणीभूत आहे तिचें रक्षण करणें आणि तिला ऊर्ध्वगामी करणें यांतूनच सर्व शक्तीचा उगम आहे. त्या वीर्याची उधळपट्टी करण्याऐवजीं जर त्याचा व्यवस्थित काटकसरीनें उपयोग केला, तर अत्यंत उच्च दर्जाच्या उत्पादक शक्तीमध्यें तिचें रूपांतर होतें. पापी विचारांनीं, नव्हे–भटक्या, अव्यस्थित, अनावश्यक विचारांनींदेखील या वीर्याचा सतत आणि नकळतसुद्धां अपव्यय होत असतो. आणि विचार हेंच उच्चाराचें आणि आचाराचें मूळ असल्यामुळें त्यांचा दर्जा विचारांच्या दर्जासारखाच असतो. म्हणून संपूर्णपणें ताब्यांत आलेला विचार हीच एक उच्च सामर्थ्य असलेली शक्ति आहे आणि ती स्वयंकर्तृत्वशाली आहे. हृदयाच्या मूक प्रार्थनेचा हाच अर्थ असावा असें मला वाटतें. मनुष्य हा जर ईश्वराचेंच प्रतिरूप असेल, तर त्याला आंखून दिलेल्या मर्यादित क्षेत्रांत त्यानें एकादी वस्तु मनांत आणण्याचा अवकाश कीं ती पार पडतेच. अशी शक्ति जो आपलें वीर्य वाटेल त्या मार्गांनीं वाटेल तसें उधळून टाकतो त्याच्यामध्यें असणें असंभवनीय आहे; भोकें पडलेल्या नळींत वाफ कोंडून ठेवली तर तिच्यांत काय ताकद असणार ? संतति उत्पन्न करण्याचा उघड हेतु सोडून देऊन झालेला संग हें अशा उधळपट्टीचें एक नमुनेदार आणि स्थूल रूप आहे व म्हणूनच ते विशेषेंकरून धिक्कारपात्र ठरविलें आहे आणि तें बरोबर आहे. पण ज्याला अत्यंत मोठ्या जनसमुदायाला अहिंसक चळवळी-करितां संघटित करायचें आहे, त्याला मीं वर सांगितला तसा संपूर्ण इंद्रियांवरील ताबा मिळविण्याचा प्रयत्न करावाच लागेल आणि तो मिळवावाच लागेल.

हा ताबा ईश्वराच्या कृपेवांचून मिळणें अशक्य आहे. गीतेच्या दुसऱ्या अध्यायांत एक श्लोक आहे. त्याचा अर्थ " मनुष्य निराहारी असेल किंवा

त्याच्या एकाद्या विशिष्ट इंद्रियाला जर उपासमार घडली असेल, तर विषय तात्पुरते पडून राहातात. पण जेव्हां परमेश्वराचें दर्शन होतें तेव्हांच त्या विषयांतील गोडीसुद्धां नाहींशी होते" असा आहे. असा ताबा यांत्रिक किंवा क्षणिक नसतो. एकदां तो मिळाला, कीं तो कधींहि नाहींसा होत नाहीं. अशा अवस्थेंत वीर्यशक्ति असंख्य द्वारांनीं बाहेर पडण्याचा संभव नाहींसा होऊन ती संग्रहित होते.

अशा तऱ्हेचें ब्रह्मचर्य प्राप्त करणें जर शक्य असेल, तर तें फक्त गिरिकंदरांतील योग्यांनाच शक्य आहे असें म्हणतात. ब्रह्मचाऱ्यानें म्हणे स्त्रीकडे पाहतां कामा नाहीं, स्पर्श तर दूरच राहिला. ब्रह्मचाऱ्यानें स्त्रीचा विचार, उच्चार, दर्शन किंवा स्पर्श **विषयवासनेनें** करूं नये ही गोष्ट खरी आहे. पण ब्रह्मचर्यावरील ग्रंथांत हा निर्बंध 'विषयवासनापूर्वक' हा महत्त्वाचा शब्द न वापरतां घातलेला आढळतो. तो वगळण्याचें कारण असें दिसतें कीं, अशा बाबतींत मनुष्य हा स्वतःच निरपेक्षपणें योग्यायोग्य पारखूं शकत नाहीं, त्यामुळें अशा संबंधांनीं आपल्यावर परिणाम होतो किंवा होत नाहीं हें तो सांगूं शकत नाहीं. मदनाचे बाण पुष्कळ वेळां अगोचर असतात. पण जगांत मोकळेपणें मिसळत असतांना ब्रह्मचर्याचें पालन कठिण असलें तरी, जर तें जगापासून निवृत्त झाल्यानें साध्य होण्याजोगें असेल, तर त्याला फारशी किंमत नाहीं.

कांहीं असो; मीं तीस वर्षांहून अधिक ब्रह्मचर्य पाळलें आहे, आणि तेंहि अनेक व्यापांत राहून बऱ्याच यशस्वी रीतीनें पाळलें आहे. ब्रह्मचारी जीवन घालवावयाचें ठरविलें, तरी माझ्या बाह्य आचारांत फारसा फरक पडला नाहीं; फक्त पत्नीशीं वागण्यांत पडला. दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोकांत काम करीत असतांना मी स्त्रियांशीं मोकळेपणानें मिसळत असें. ट्रान्सवालमध्यें आणि नेटलमध्यें अशी एकहि हिंदी स्त्री नव्हती, कीं जिला मी ओळखीत नव्हतों. त्या मला मुली-बहिणींसारख्या होत्या.

माझें ब्रह्मचर्य पुस्तकातून निघालेलें नव्हतें. माझ्या आणि माझ्या सांगण्यावरून जे या प्रयोगांत दाखल झाले होते, त्यांच्या मार्गदर्शनासाठीं मी माझे स्वतःचे नियमच तयार करीत असें. शास्त्रांत सांगितलेल्या निर्बंधाप्रमाणें जसा मी वागलों नाहीं, तसेंच किंबहुना त्याहूनहि अधिक, धार्मिक साहित्यांतसुद्धां स्त्रीला जें साऱ्या पापांचें आणि मोहांचें उगमस्थान म्हणून वर्णिलें आहे, तें वर्णन मीं मान्य केलें नाहीं. माझ्यांत जें कांहीं चांगलें असेल तें सर्व मला माझ्या आईकडून मिळालें आहे असें मी मानीत असल्यामुळें मी स्त्रीकडे कधीं विषयवासनेच्या तृप्तीचें साधन म्हणून पाहात आलों नाहीं; तर माझ्या स्वतःच्या आईविषयींच्या पूज्यभावनेनेंच मी तिच्याकडे पाहात आलों आहे. पुरुष हाच मोह उत्पन्न करणारा आणि आक्रमक वृत्तीचा आहे. स्त्रीचा स्पर्श पुरुषाला विटाळ करीत नसून स्वतः पुरुषच इतका अशुद्ध आहे, कीं त्याचा स्त्रीला विटाळ होईल. पण अलिकडे ब्रह्मचाऱ्यानें किंवा ब्रह्मचारिणीनें विरुद्ध लिंगाच्या व्यक्तीला स्पर्श करण्याच्या बाबतींत स्वतःवर कोणत्या स्वरूपाच्या मर्यादा घालून घ्याव्यात यासंबंधीं माझ्या मनांत एक शंका उपस्थित झाली आहे. मीं ज्या मर्यादा घातल्या आहेत, त्या माझ्या मलाच समाधानकारक वाटत नाहींत. त्या काय असाव्यात हें मला कळत नाहीं. माझे प्रयोग चालू आहेत. माझ्या व्याख्येप्रमाणें मी पूर्ण ब्रह्मचारी झालों आहे असें मला वाटत नाहीं. अहिंसेच्या संशोधनार्थ विचारावर जो अंकुश ठेवण्याची आवश्यकता आहे तो मला साध्य झालेला नाहीं. माझी अहिंसा जर संसर्गानें आणि स्पर्शानें दुसऱ्यांत उतरावयाची असेल, तर मला माझ्या विचारांवर अधिक ताबा मिळविला पाहिजे. कठेंतरी कांहीं न्यून असलें पाहिजे. त्याशिवाय या लेखाच्या सुरवातीच्या वाक्यांत उल्लेखिलेल्या माझ्या पुढारीपणाच्या अयशस्वितेचें दुसरें काय कारण असणार ?

अहिंसेवरील माझा विश्वास पूर्वीइतकाच बळकट आहे. आपल्या देशाच्या सर्व अडचणी तिच्या योगानें दूर होतील, इतकेंच नव्हे, तर तिचा प्रयोग योग्य रीतीनें केला गेला तर आज हिंदुस्थानच्या बाहेर चाललेला आणि पाश्चात्य राष्ट्रांवर ओढवूं पाहाणारा रक्तपातसुद्धां तिच्या योगानें थांबला पाहिजे असें खात्रीपूर्वक मला वाटतें.

माझी आकांक्षा मर्यादित आहे. जगाला अहिंसेच्या मार्गाला लावण्याची शक्ति कांहीं ईश्वरानें मला दिलेली नाहीं पण मी कल्पना करून चाललों आहे कीं, हिंदुस्थानच्या अनेक दुःखांवर इलाज व्हावा म्हणून त्याच्यापुढें अहिंसा ठेवण्यांत ईश्वरानें मला निमित्तमात्र केलें आहे. आतांपर्यंत झालेली ही प्रगति मोठी आहे. पण अजून पुष्कळ करायचें उरलें आहे. आणि तरीहि सर्वसाधारण कॉंग्रेस-अनुयायांच्याकडून जी संवादी क्रिया घडायला पाहिजे ती त्यांच्यांत जागृत करण्याची शक्ति माझ्यांतून नष्ट झाल्यासारखी वाटते. 'स्वयंपाक येईना ओली लांकडें' म्हणतात. काम सदोष झाल्याबद्दल आपल्या शिपायांना नांवें ठेवणारा सेनापति नालायक असतो. मी तसा नालायक सेनापति नाहीं हें मला माहीत आहे. माझ्या मर्यादा काय तें समजण्याइतपत शहाणपणा माझ्यांत आहे. माझें दिवाळेंच निघायचें असेल, तर ती दिवाळखोरी जाहीरपणें कबूल करण्याइतकें बळ ईश्वर मला देईल. गेलीं जवळजवळ पन्नास वर्षें जें काम त्यानें मला करूं दिलें, त्यासाठीं आतां जर माझी गरज नसेल तर तो कदाचित् मला घेऊनहि जाईल. पण मला निश्चितपणें आशा वाटतें कीं, मला करण्याजोगें अजून पुष्कळ काम आहे. मला घेरून टाकतोसा वाटणारा अंधार नाहींसा होईल आणि दांडीकूचपेक्षांहि अधिक तेजस्वी लढाई देऊन किंवा न देतां हिंदुस्थान अहिंसेच्या साधनानें स्पष्टपणें स्वतंत्र होईल. हा अंधार नाहींसा करणाऱ्या प्रकाशाकरितां मी प्रार्थना करीत आहे. ज्यांची अहिंसेवर जिवंत श्रद्धा आहे त्यांनीं मला या प्रार्थनेंत साथ द्यावी.

हरिजन : २३-७-१९३८

माझे लेख काळजीपूर्वक वाचणाऱ्या माझ्या एका सहकारी कार्यकर्त्याला मी संततिनियमनाकरितां * 'सुरक्षित काळांतील समागम-' पद्धतीला मान्यता देण्याचा संभव आहे असें वाचून कसेसेंच वाटलें. संततिनियमनाचीं साधनें वापरण्याइतकीच घृणा या पद्धतीबद्दल मला कशी वाटत नाहीं आणि ही पद्धति फक्त विवाहित जोडप्यांच्याच बाबतींत बहुंशीं कशी खुली आहे हें त्या सद्गृहस्थांना स्पष्टपणें समजावून देण्याचा मी प्रयत्न केला. परंतु या विषयासंबंधीं चर्चा करतांना आम्हांला कल्पनाहि नव्हती इतक्या खोलांत आम्ही शिरलों. संतति-नियमनाच्या साधनांइतकाच या 'सुरक्षित काळांतील समागम' पद्धतीचाहि माझ्या या मित्रांना तिटकारा आहे. यावरून मला असें दिसून आलें कीं, सामान्य माणसेंसुद्धां स्मृतींनीं सांगितलेला संयम पाळतील अशी शक्यता आहे, असा त्यांना विश्वास वाटतो. पतिपत्नींना खरोखरच संततीची इच्छा असेल त्याचवेळीं त्यांनीं संग करावा, हा स्मृतींनीं घालून दिलेला नियम आहे. मला या नियमाची माहिती होती खरी; पण या चर्चेमुळें ज्या प्रकाशांत मी त्या नियमाकडे पाहूं लागलों ती दृष्टि पूर्वीं मला नव्हती. इतकीं वर्षें हा नियम म्हणजे एक पूर्णत्वाचा आदर्श म्हणून सांगितला असावा, तो अक्षरशः व्यवहारांत आणावयाचा नाहीं, असेंच मी समजत होतों. आणि माझी अशी समजूत होती कीं, जोंवर विवाहित जोडपीं परस्परांच्या संमतीनें पण खास संततीचीच इच्छा मनांत न ठेवतां संग करतात तोंवर विवाहाचा हेतु तीं बरोबर अमलांत आणीत आहेत; त्यांत स्मृतीच्या कोणत्याहि आज्ञेचा भंग होत नाहीं. पण या नव्या प्रकाशांत जेव्हां मी स्मृतीची भाषा पाहूं लागलों तेव्हां एक अगदी

* सुरक्षित काळ:—मासिक ऋतुकालापूर्वींचे दहा दिवस.

नवीन गोष्ट मला कळून आली. स्मृतींची आज्ञा कडकपणें पाळणारें पतिपत्नी हे अविवाहित आणि ब्रह्मचारी जीवन घालविणाऱ्या माणसां-इतकेच ब्रह्मचारी आहेत, या म्हणण्याचा अर्थ पूर्वी कधींहि मला समजला नव्हता तो आतां समजला.

या नव्या प्रकाशाप्रमाणें, स्त्रीपुरुषसंयोगाचा एकमेव हेतु संततीची इच्छा हाच आहे, कामवासनेची पूर्ति हा नाहीं. विवाहाच्या या कल्पने-प्रमाणें निव्वळ वासनापूर्ति म्हणजे लंपटपणाच होय. जो संभोग आजवर आपण निष्पाप आणि नीतियुक्त मानीत होतों त्याच्याविषयीं हा शब्द वापरणें कटु वाटेल. पण मला रूढीसंबंधीं बोलावयाचें नाहीं. हिंदु ऋषींनीं पुढें मांडलेल्या विवाहशास्त्रासंबंधीं बोलावयाचें आहे. त्यांची मांडणी कदाचित् दोषयुक्त असेल, कदाचित् ती सर्वस्वीं चूकहि असेल. पण निरनिराळीं स्मृतिवचनें अंत:स्फूर्त आणि अनुभवाच्या पायावर रचलेलीं मानणाऱ्या माझ्यासारख्याला त्यांचा अर्थ पूर्णत्वानें स्वीकार-ण्यावांचून गत्यंतर नाहीं. वस्तूंचें सत्यदर्शन करण्याचा आणि कांहीं जुनीं शास्त्रवचनें त्यांच्या संपूर्ण अर्थाप्रमाणें कसोटीला लावून पहाण्याचा या व्यतिरिक्त दुसरा मार्ग मला माहीत नाहीं. मग ही कसोटी कितीहि कठिण वाटो, किंवा तिच्यामधून निघालेले निर्णय कितीहि कटु वाटोत.

तेव्हां मीं वर जें सांगितलें त्याच्या प्रकाशांत कृत्रिम साधनांनीं किंवा तत्सम प्रकारांनीं संततिनियमन करणें ही मोठी घोडचूक आहे. मी हें माझी जबाबदारी पूर्ण समजून लिहीत आहे. मिसेस् मार्गरेट सँगर आणि त्यांचे अनयायी यांच्याविषयीं मला मोठा आदर आहे. आपल्या कार्या-विषयींच्या त्यांच्या उत्कट उत्साहाचा माझ्यावर मोठा परिणाम झाला. संततीची इच्छा नसतांना तिला वागविण्याचें आणि वाढविण्याचें ओझें वाहावें लागण्याचा ज्यांना त्रास होतो, अशा स्त्रियांबद्दल त्यांना वाटणारी सहानुभूति मी जाणतों. पुष्कळ प्रॉटेस्टंट धर्माचार्य, शास्त्रज्ञ, पंडित

आणि डॉक्टरलोक यांचा संततिनियमनाच्या या पद्धतीला पाठिंबा आहे हें मला माहीत आहे. या लोकांपैकीं अनेकांशीं प्रत्यक्ष परिचय असण्याचें भाग्य मला लाभलें आहे, आणि त्यांच्याविषयीं माझ्या मनांत मोठा आदर वसत आहे. तथापि, माझ्या वाचकांपासून किंवा या पद्धतीच्या त्या थोर पुरस्कर्त्यांपासून मी माझें मत छपवीन, तर मी माझ्या ईश्वराशीं बेईमानी केल्यासारखें होईल. माझा ईश्वर म्हणजे सत्य—एकमेव सत्य. आणि जर मी माझें मत लपविलें, तर मला माझी चूक—माझें आजचें मत समजा चुकीचें असलें तर—कधींच खरोखर आढळून येणार नाहीं शिवाय, असे पुष्कळ स्त्रीपुरुष आहेत कीं जे मला मार्गदर्शक मानून अनेक नीतिविषयक प्रश्नांत माझा सल्ला स्वीकारतात. यांत हा संततिनियमनाचा प्रश्नहि अंतर्भूत आहे. त्यांच्या करितांहि माझें मत प्रदर्शित करणें इष्ट आहे.

संततीचें नियमन व निग्रह झाला पाहिजे, या बाबतींत संततीनियमनाचीं किंवा तत्सम साधनें वापरावीं म्हणणाऱ्यांत आणि माझ्यांत मतभेद नाहीं. संयमनाच्या द्वारा हा निग्रह करणें कठिण आहे हेंहि अमान्य करतां येणार नाहीं. तरीसुद्धां मनुष्यजातीला जर आपलें साध्य साधावयाचें असेल, तर यावाचून दुसरा मार्ग नाहीं. चर्चाविषय बनलेल्या या कृत्रिम पद्धतीचा जर सर्वत्र स्वीकार केला गेला, तर मनुष्यजातीचा नैतिक अधःपात होईल अशी माझी मनोमन खात्री आहे. या पद्धतीच्या पुरस्कर्त्यांकडून याच्याविरुद्ध पुरावा पढें केला जात असतांनासुद्धां मी हें सांगत आहे.

मी अंधश्रद्धाळू नाहीं असें मला वाटतें. सत्य हें प्राचीन आहे म्हणूनच केवळ हें सत्य नव्हे, किंवा तें प्राचीन आहे म्हणूनच त्याकडे संशयाच्या दृष्टीनें पाहिलें पाहिजे हेंहि अवश्य नाहीं. जीवनाच्या अशा कांहीं मूलभूत गोष्टी आहेत, का ज्या आपल्या

आयुष्यांत अमलांत आणणें कठिण असलें तरी त्यांना कमी लेखून टाकून देतां येणार नाहीं.

संयमाच्या द्वारा संततिनियमन करणें हें कठिण आहे यांत शंका नाहीं. तथापि त्याच्या कार्यसाधकतेविषयीं आणि संततिनियमनाच्या कृत्रिम साधनांच्या वापरापेक्षां तें श्रेष्ठ आहे याविषयीं कोणाचें खरोखर दुमत असल्याचें अजून तरी ऐकिवांत नाहीं.

तेव्हां, कामोपभोग हाच एक परम आनंद आहे असें कोणी मानीत असेल तर गोष्ट वेगळी. नाहीं तर मला वाटतें, कीं स्त्रीपुरुषसंयोगाचा अत्यंत मर्यादित उपयोग करण्याविषयीं जी शास्त्राज्ञा आहे तिच्या सूचितार्थाचा संपूर्ण स्वीकार केला, तर संयमाचें पालन हें पुष्कळच सुकर होतें. जननेंद्रियाचें कार्य प्रजोत्पत्ति करणें हेंच केवळ आहे. अर्थात् प्रजा म्हणजे विवाहित जोडप्याला शक्य आहे तेवढी उत्तमोत्तम प्रकारची प्रजा. हें कार्य तेव्हांच घडूं शकेल आणि घडावें जेव्हां दोघां-नाहि अशा संयोगाची परिणती जी संतति तिची इच्छा असेल; विषयाची नव्हे. म्हणून संततीच्या इच्छेव्यतिरिक्त अशा संयोगाची इच्छा ही अधार्मिक समजली पाहिजे आणि तिचें संयमन केलें पाहिजे.

असा निग्रह करणें आपल्याला शक्य आहे कीं नाहीं याचा विचार पुढील प्रकरणीं.

हरिजन : १४-३-१९३६

आज आपल्या समाजांत संयमाचें वातावरण निर्माण होण्याला अनुकूल असें कांहींच नाहीं. आमचें शिक्षणच मुळीं त्याच्या विरुद्ध आहे. आपल्या मुलांचीं एकदांचीं कशींबशीं लग्नें करून टाकायचीं म्हणजे मग त्यांना डुकरासारखीं पोरें होतील, हीच आईबापांची मुख्य चिंता असते. त्या मुली असल्या तर सोयीला पडेल तितक्या लहान वयांत त्यांचीं लग्नें केलीं जातात. मग नैतिक कल्याणाच्या दृष्टीनें त्यांचें कांहीं कां होईना ! लग्नसमारंभ म्हणजे मेजवान्या आणि निरर्थक डामडौलांनीं भरलेली एक दीर्घसूत्री व्यथाच असते! नव्या बनलेल्या गृहस्थाचें जीवन हें गतकालाला धरूनच पुढें चालू होतें. हें जीवन म्हणजे दीर्घकालपर्यंत इंद्रियासक्ति. कामसक्त जीवन घालविण्याकरितां अधिकांत अधिक अनिर्बंधपणा मिळेल अशा रीतीनें सुटीचे दिवस आणि सामाजिक करमणुकीच्या गोष्टी आंखल्या जातात. जें साहित्य डोक्यांत कोंबलें जातें, तें बहुतकरून पाशवी विकारांना उत्तेजित करणारेंच असतें. अगदीं अद्यावत् साहित्य हें पाशवी विकारांत रत राहाणें हें कर्तव्यकर्म आहे आणि संपूर्ण जितेंद्रियता हें पाप आहे, असेंच जवळजवळ शिकवितें.

मग कामक्षुधा ताब्यांत ठेवणें हें कठिणच नव्हे, तर जवळजवळ अशक्यप्राय व्हावें यांत नवल तें काय ? म्हणून संयमाच्या द्वारा संततिनियमन ही जर अत्यंत इष्ट, शहाणपणाची आणि संपूर्णपणें निरुपद्रवी पद्धति असेल, तर आपण समाजाचा आदर्श आणि वातावरण यांत बदल घडवून आणला पाहिजे. हें इष्ट साध्य घडवून आणण्याचा मार्ग फक्त एकच आहे. तो हा कीं, ज्या व्यक्तींची संयमाच्या पद्धतीवर श्रद्धा आहे, त्यांनीं स्वतःच प्रारंभ करावा आणि अढळ श्रद्धेनें आपल्या आजुबाजच्या

वातावरणावर परिणाम करावा. गेल्या लेखांत मीं विवाहाविषयींची जी कल्पना चर्चिली ती, मला वाटतें, त्यांना अत्यंत सार्थ वाटेल. ती कल्पना बरोबर आकलन झाली म्हणजे संपूर्ण मानसिक क्रांति होईल. ती कांहीं थोड्या निवडक लोकांकरितांच आहे असें नव्हे. मानवजातीचा तो कायदा म्हणून पुढें मांडला गेला आहे. या कायद्याच्या भंगानें मानवी प्राण्यांचा दर्जा कमी होतो आणि नको असलेल्या मुलांच्या वाढत्या संख्येच्या रूपानें त्यांना तत्काळ शिक्षाहि मिळते. त्याच्या भंगानें सतत वाढत जाणाऱ्या रोगांची मालिका सुरू होते आणि सृष्टिकर्त्याला जबाबदार अशा तऱ्हेचें मनुष्याचें नैतिक नाते तुटून जाते. कृत्रिम साधनांनीं केलेल्या संततिनियमनानें कांहीं अंशीं नव्या उत्पन्न होणाऱ्या मुलांची संख्या कमी होते आणि उपासमार टळते ही गोष्ट खरी आहे. पण त्याच्या योगानें व्यक्तीची आणि समाजाची होणारी हानी अपरिमित आहे. एक तर आपली भोगाची भूक भागविण्याकरितांच जे कामवासना पुरवून घेतात त्यांची जीवनाकडे पाहाण्याची दृष्टि सर्वस्वीं बदलते. विवाहाकडे धार्मिक बंधन म्हणून पाहाण्याची त्यांची दृष्टि नाहींशी होते. म्हणजेच जे सामाजिक आदर्श आतांपर्यंत बहुमोल ठेवा म्हणून आपण मानीत आलों, त्यांचें मूल्य बदलणें असा याचा अर्थ होतो अर्थात् विवाहाच्या जुन्या आदर्शांना जे धर्मभोळेपणा समजतात, त्यांना हें म्हणणें मुळींच पटणार नाहीं, यांत शंका नाहीं. पण माझें हें सांगणें जे लोक विवाहाला धार्मिक विधि समजतात आणि जे स्त्रीला पाशवी भोगाचें साधन न मानतां पुरुषाची माता आणि आपल्या संततीच्या सच्छीलाची विश्वस्त म्हणून मानतात, त्यांनाच फक्त उद्देशून आहे.

मीं आणि माझ्या सहकाऱ्यांनीं आचरलेल्या आत्मसंयमनाच्या अनुभवानें मीं वर व्यक्त केलेलें मतच दृढ होतें. विवाहाविषयींच्या प्राचीन कल्पनेचा अत्यंत स्वच्छ प्रकाशांत बोध झाल्यानें या अनुभवाला जबरदस्त सामर्थ्य प्राप्त होतें. माझ्या बाबतींत आतां वैवाहिक जीवनांतील

ब्रह्मचर्य ही वस्तु स्वाभाविक आणि अपरिहार्य होऊन बसली आहे; आणि खुद्द विवाहाइतकीच ती सहज झाली आहे. संततिनियमनाकरितां याहून दुसरी कोणतीहि पद्धति निरुपयोगी वाटते. मनांतसुद्धां आणूं नयेशी वाटते. जननेंद्रियाचें एकमेव आणि उदात्त कार्य उत्पत्ति हें आहे, ही कल्पना एकदां स्त्रीपुरुषांना बरोबर आली, म्हणजे मग दुसऱ्या कोणत्याहि हेतूनें एकत्र येणें म्हणजे आपल्या वीर्याचा घोर दुरुपयोग करणें आहे व त्याचबरोबर आपल्यांत उत्पन्न होणारी उत्तेजिता ही बहुमोल अशा शक्तीचा व्यर्थ व्यय आहे, असें त्यांना वाटूं लागेल. जुन्या शास्त्रकारांनीं वीर्याची इतकी मोठी किंमत कां मानली आहे, आणि समाजाच्या हिताकरितां वापरल्या जाणाऱ्या शक्तींत त्याचें रूपांतर व्हावें असा त्यांचा जबरदस्त आग्रह कां आहे, हें आतां समजून येईल. ते छातीठोकपणें सांगतात कीं, ज्यानें किंवा जिनें आपल्या कामशक्तीवर ताबा मिळविला आहे त्याचें वा तिचें सबंध जविन—शारीरिक, मानसिक आणि आध्यात्मिक जीवन—खंबीर बनतें, आणि दुसऱ्या कोणत्याहि साधनांनीं मिळणार नाहीं अशा दुर्लभ शक्तीचा त्याला वा तिला लाभ होतो.

जगांत असे महान् ब्रह्मचारी आदर्श म्हणून पाहाण्याला अनेक किंवा एकसुद्धां नाहीं, म्हणून वाचकांनीं आपलें मत विचलित होऊं देऊं नये. आपल्या आजुबाजूला आपण जे ब्रह्मचारी आज पाहत आहों, ते फार अपूर्ण असे नमुने आहेत. फार तर त्यांना साधक म्हणतां येइल. त्यांनीं आपल्या शरीरावर ताबा मिळविलेला असतो, मनावर नाहीं. मोहाचा मुळींच पगडा बसणार नाहीं अशी त्यांची स्थिति नसते. याचें कारण ब्रह्मचर्य ही वस्तु साधण्याला फार कठिण आहे असें नव्हे. भोंवतालचें सामाजिक वातावरण त्यांना विरोधी असतें, आणि प्रामाणिकपणें प्रयत्न करणाऱ्यांपैकीं बहुतेकजण या पाशवी विकाराला इतर विकारांपासून नेणतेपणानें वेगळा काढून त्यावर अंकुश ठेवावयाचा असें समजतात. वास्तविक या विकारावर यशस्वी रीत्या ताबा मिळवावयाचा असेल,

तर मनुष्य ज्या ज्या विकारांना बळी पडत असेल, त्या सर्व विकारांवर ताबा मिळविण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. सर्वसाधारण पुरुषाला किंवा स्त्रीला ब्रह्मचर्य साध्य होणें अशक्य नसलें,तरी कोणी असें समजूं नये कीं एकाद्या साधारण विद्यार्थ्यानें कोणत्याहि एका शास्त्रांत पारंगत व्हावयाचें ठरविलें, तर त्याला जितका प्रयत्न करावा लागेल, त्याहून ब्रह्मचर्य साध्य करण्याला कमी प्रयत्न करावा लागेल. या ठिकाणीं ज्या अर्थानें 'ब्रह्मचर्य' हा शब्द योजला आहे, तें ब्रह्मचर्य साध्य करणें म्हणजे जीवनशास्त्रांत पारंगत होणें आहे.

हरिजन : २१-३-१९३६

---

## संयमधर्म : : : १६

एक सद्‌गृहस्थ लिहितात :—

" संयमावरील तुमच्या अलिकडच्या लेखांनीं मोठी गडबड उडवून दिली आहे. तुमच्या मतांशीं सहमत असणाऱ्या मंडळींना वाटेल तितक्या काळपर्यंत संयम पाळणें कठिण वाटतें. त्यांचें म्हणणें असें कीं, तुम्ही आपला अनुभव आणि आचार साऱ्या जगाला लावूं पहात आहां. आणि तुम्हीसुद्धां कबूल केलें आहे कीं, पूर्ण ब्रह्मचाऱ्याच्या व्याख्येप्रमाणें मीहि बनलेलों नाहीं. कारण तुम्ही स्वतःसुद्धां पाशवी विकारांपासून मुक्त नाहीं. आणि ज्याअर्थीं विवाहित दंपतीला होणाऱ्या मुलांची संख्या मर्यादित करण्याची आवश्यकता तुम्हीहि मान्य करतां, त्याअर्थीं जगांतील बहुसंख्य मानवप्रजेला कृत्रिम संततिनियमनाचीं साधनें वापरणें हाच एकमेव व्यावहारिक मार्ग मोकळा राहतो. "

ब्रह्मचर्याच्या बाबतींतील माझ्या मर्यादा मीं कबूल केल्या आहेत. ब्रह्मचर्य कीं कृत्रिम साधनें, या प्रश्नाच्या बाबतींत त्या माझे गुणच प्रस्थापित करतात. कारण, माझ्या मर्यादा हेंच स्पष्टपणें दाखवितात कीं, या मातीच्या जमिनीवर इतरांप्रमाणेंच मीहि मातीचाच बनलेलों आहें आणि म्हणून कसलेहि लोकाविलक्षण गुण माझ्यामध्यें असणें शक्य नाहीं. मीं संयम पाळला त्यांतील हेतुहि अगदीं सामान्य होता; तो म्हणजे देशाची अथवा मानवजातीची सेवा आपल्या हातून व्हावी म्हणून संतती मर्यादित करणें. आपल्या देशाची अथवा मानवजातीची सेवा करावी या अतिशय दूरच्या गोष्टीपेक्षांसुद्धां मोठ्या कुटुंबाचें भरणपोषण करणें अशक्य आहे, या गोष्टीनें वास्तविक संयमाची अधिक प्रेरणा मिळावी. पस्तीस वर्षें यशस्वीरीत्या ( आजच्या दृष्टीनें ) संयम पाळला असतांना सुद्धां माझ्यामधल्या पशूवर अजून पहारा करण्याची जरूर भासते यावरून हें उत्कृष्टपणें दिसून येतें कीं, मी एक अगदीं सामान्य मर्त्य आहे. म्हणून मी आग्रहपूर्वक सांगतों कीं, मला जें शक्य झालें आहे, तें अवश्य तितका प्रयत्न करणाऱ्या कोणाहि मनुष्यप्राण्याला शक्य आहे.

कृत्रिम साधनांच्या पुरस्कर्त्यांशीं माझें याचकरिता भांडण आहे कीं, ते सर्वसामान्य माणसांना संयमपालन शक्य नाहीं असें गृहीतच धरून चालतात. त्यांच्यापैकीं कांहींजण तर असेंहि म्हणावयाला कमी करीत नाहींत कीं, माणसांना संयम पाळतां आला तरी त्यांनीं तो पाळतां कामा नये. असें म्हणणारे लोक आपापल्या क्षेत्रांत कितीहि नामांकित असले, तरी त्यांना अत्यंत नम्रपणें पण विश्वासपूर्वक माझें हें सांगणें आहे कीं, संयमाच्या बाबतींत कोणत्या संभवनीय गोष्टी आहेत याचा अनुभव न घेतांच तुम्ही बोलत असतां. मानवी आत्म्याचें सामर्थ्य मर्यादित करण्याचा तुम्हांला कांहींहि अधिकार नाहीं. अशा उदाहरणांत माझ्यासारख्या एका माणसाचा निःसंदिग्ध पुरावा—जर तो विश्वसनीय असेल तर—केवळ बहुमोलाचाच नव्हे, तर निर्णयात्मक असतो. मला लोक

'महात्मा' मानतात म्हणून माझा पुरावा बाजूला करणें हें गंभीरपणें चालविलेल्या शोधांच्या बाबतींत न्याय्य ठरणार नाहीं.

वस्तुस्थितीच्या दृष्टीनें बोलणाऱ्या एका बाईचा पुढील युक्तिवाद पुष्कळच विचारणीय आहे : "कृत्रिम साधनांचे पुरस्कर्ते आम्ही लोक अगदीं आलिकडे पुढें आलों आहों. कितीतरी पिढ्यान्‌पिढ्या, हजारों वर्षे-हि असेल, तुम्हीं संयमवादी लोकच वावरत होतां. इतक्या दिवसांत दाखविण्याजोगें तुम्हीं काय गांठीशीं बांधलें आहे ? जगानें संयमाचा धडा घेतला आहे काय ? भारानें वांकून गेलेल्या कुटुंबांचे हाल थांबवि-ण्याकरितां तुम्हीं काय केलें आहे ? व्यथित अशा मनाचा आक्रोश तुमच्या कानीं आला आहे का ? चला, अजूनहि तुम्हांला क्षेत्र मोकळें आहे. तुम्ही संयमाचा पुरस्कार केलात, तरी आम्ही कांहीं म्हणत नाहीं. नवऱ्यांकडून होणाऱ्या पण स्त्रियांना नको असलेल्या समागमापासून तुम्ही जर स्त्रियांना वांचवूं शकलात, तर आम्ही तुम्हांला यशहि चिंतू. पण आम्ही ज्या पद्धती अंमलांत आणतों, ज्या पद्धतींमध्यें सर्वसामान्य मानवाची दुर्बलता किंवा संवयी लक्षांत घेतल्या जातात आणि त्यांना सर्वस्वीं सूट दिली जाते, ज्या योग्य रीतीनें अमलांत आणल्या तर आपला हेतु साध्य केल्यावांचून कधींहि राहात नाहींत, अशा पद्धतीं-विरुद्ध तुमचा ओरडा कां ?"

वरील युक्तिवादांत जो एक टोमणा आहे त्याच्यामागें एका भगि-नीचा सात्त्विक संताप आहे. एकसारख्या वाढत जाणाऱ्या मुलांच्या संख्येमुळें जीं कुटुंबें नेहमीं हलाखींत असतात त्यांच्याविषयींच्या अनुकंपेनें तिचें हृदय भरलें आहे. मनुष्याच्या दुःखाच्या आर्तनादानें फत्तराचीं हृदयेंसुद्धां वितळतात असें दिसून येतें. मग थोर हृदयाच्या भगिनीं वर त्याचा परिणाम झाल्यावांचून कसा राहील ?

पण, जर आपल्या पायाखालचा आधार सुटला आणि एकाद्या बुडत्या माणसाप्रमाणें आपण वाहत्या काडीला आधारासाठीं पकडलें,

तर कदाचित् अशा आर्तनादांनीं आपण आपल्या मार्गापासून सहज बाजूला जाण्याचाहि संभव आहे.

जीवनाचीं मूल्यें झपाट्यानें बदलत आहेत अशा काळांत आपण राहात आहोंत. अल्पगतीनें होणाऱ्या परिणामांनीं आमचें समाधान होत नाहीं. आपल्या ज्ञातिबांधवांचें, नव्हे आपल्या देशाचेंसुद्धां कल्याण होण्यानें आपण संतुष्ट होत नाहीं. साऱ्या मानवजातीविषयीं आपल्याला कळकळ वाटते किंवा वाटावी असें वाटतें. मानवजातीची आपल्या ध्येयाकडे जी गति चालू आहे तिला ही गोष्ट म्हणजे मोठा लाभ आहे.

पण धीर गमाविल्यानें आणि जुन्याला तें जुनें म्हणून बाजूला सारल्यानें कांहीं आपण मानवी व्याधींवर इलाज शोधूं शकणार नाहीं. जीं स्वप्नें आज आमच्यांत उत्साहाचा जोम उत्पन्न करीत आहेत, तींच स्वप्नें आमच्या वाडवडिलांनाहि पडत होतीं. तीं त्यावेळीं अस्पष्ट असतील कदाचित्. तशा प्रकारच्या व्याधींवर त्यांनीं जे उपचार केले तेच उपचार आज अपेक्षेपलिकडे विस्तृत झाल्यासारख्या भासणाऱ्या क्षितिजालाहि लागू होतील अशी शक्यता आहे.

आणि माझें निश्चित अनुभवाच्या आधारानें असें म्हणणें आहे कीं, सत्य आणि अहिंसा हीं तत्त्वें जशीं निवडक अशा कांहीं लोकांनींच आचरणांत आणावयाचीं असें नाहीं, तर सर्व मानवांनीं आपल्या नित्याच्या जीवनांत अमलांत आणावयाचीं आहेत, अगदीं त्याचप्रमाणें संयम हा कांहीं थोड्या ' महात्म्यां'च्याकरितां आहे असें नसून तो सर्व मानवांनीं पाळण्याकरितां आहे. आणि ज्याप्रमाणें पुष्कळ लोक मिथ्याचारी आणि हिंसक होतील म्हणून मानवजातीनें कांहीं आपला आदर्श खालीं आणावयाचा नाहीं, त्याचप्रमाणें जरी पुष्कळ, नव्हे बहुतेक माणसें संयमाचा संदेश ऐकणार नाहींत, तरीसुद्धां आपण आपला आदर्श खालीं आणतां कामा नये.

शहाणा न्यायाधीश एकादा खटला दगदगीचा आहे म्हणून एकदम कांहीं चुकीचा निकाल देणार नाहीं. यानें आपलें हृदय कठोर बनविलें आहे असें जरी लोकांना वाटलें तरी तो तसें वाटूं देईल. कारण, वाईट न्याय न करण्यांतच खरी दया आहे हें त्याला माहीत असतें.

नश्वर देहाचें दौर्बल्य त्यामध्यें वास करणाऱ्या अक्षय्य आत्म्याला आपण लावतां कामा नये. आत्म्यावर सत्ता चालविणारे जे नियम आहेत, त्या नियमांच्या प्रकाशांत आपण आपल्या देहाला बंधनें घातलीं पाहिजेत. माझ्या नम्र मतानें हे नियम फार थोडे आणि अपरिवर्तनशील आहेत. साऱ्या मानववंशाला ते समजण्याजोगे आणि तदनुरूप आचरण करण्याजोगे ते आहेत. हे नियम लागू करतांना ते किती प्रमाणांत लागू करावे या बाबतींत मतभेद असूं शकतील; पण त्यांच्या स्वरूपाच्या बाबतींतच मतभेद असणार नाहीं. आपल्यामध्यें जर श्रद्धा असेल, तर आपण ती गमावूं नये. कारण, मानवजातीला आपलें ध्येय ओळखण्याला किंवा त्या ध्येयाच्या जवळ जाण्याला अथवा त्या ध्येयाचें दर्शन होण्याला कदाचित् लाखों वर्षे लागतील. जवाहरलालच्या भाषेंत बोलावयाचें तर, ‘ बिनचूक ध्येयवाद तरी निदान आपण बाळगूं या ! ’

पण वर उल्लेखिलेल्या एका भगिनीच्या आव्हानाला उत्तर द्यावयाचें राहिलें. संयम-पुरस्कर्ते कांहीं स्वस्थ बसलेले नाहींत. ते आपला प्रचार चालवीतच आहेत. कृत्रिम साधनांच्या पद्धतीपेक्षां त्यांची पद्धति जर स्वरूपतःच भिन्न आहे, तर त्यांचा प्रचारहि तसाच भिन्न आहे आणि असला पाहिजे. संयम-पुरस्कर्त्यांना दवाखान्यांची गरज नाहीं. आपल्या उपचाराची त्यांना जाहिरात करतां येत नाहीं. याचें साधें कारण असें कीं, ती कांहीं एक विकण्याजोगी किंवा देतां–घेतां येण्याजोगी वस्तु नव्हे. कृत्रिम साधनांवरील त्यांची टीका आणि लोकांनीं त्यांचा उपयोग करूं नये म्हणून ते देत असलेल्या सूचना, हा त्यांच्या प्रचाराचाच एक

भाग आहे. या प्रचाराची विधायक बाजू सदोदित पुढें ठेवली गेली आहे. पण स्वाभाविकपणेंच ती न भासण्यासारख्या आणि न दिसण्या-सारख्या रीतीनें. संयमाचा पुरस्कार कधींहि थांबून राहिलेला नाहीं. त्याचा अत्यंत परिणामकारक पुरस्कार म्हणजे 'करून दाखविणें' हाच आहे. यशस्वी रीत्या संयम आचरणांत आणणाऱ्या प्रामाणिक लोकांची संख्या जितकी जास्त, तितका प्रचार अधिक परिणामकारक ठरतो.

हरिजन : ३०-५-१९३६

---

## संयमाच्या द्वारा संततिनियमन : : १७

पुष्कळ दिवस माझ्या फाइलांत पडून राहिलेल्या एका पत्रांत पुढील-प्रमाणें मजकूर आहे :—

" संततिनियमनाच्यामागें वेडें होण्याची लाट आज साऱ्या जगभर पसरली आहे. हिंदुस्थानहि त्याला अपवाद नाहीं. आपण संयमाच्या बाजूनें जे लेख लिहीत आहां ते मी लक्ष्यपूर्वक वाचीत असतों, आणि त्यावर माझा विश्वास आहे. अहमदाबाद येथें नुकतेंच एक 'संतति-नियमन मंडळ' स्थापन करण्यांत आलें आहे. स्त्रीपुरुषांना बिनधोक-पणें अमर्याद भोग भोगतां यावा यासाठीं संततिनियमनाच्या आधुनिक साहित्याचा हें मंडळ पुरस्कार करीत आहे.

" ज्यांचें स्वतःचें आयुष्य आतां ढळत्या बाजूला लागलें आहे अशा सज्जन लोकांनींच अशी चळवळ उचलून धरावी हें मला चमत्कारिक वाटतें. या चळवळीमुळें साऱ्या मानववंशाचें सत्त्वच निपटून जाणार

संततिनियमनाचा हेतु साध्य करण्याकरितां या मंडळींनीं ‘ संततिनियमन मंडळ ’ काढण्याऐवजीं ‘ इंद्रियनियमन मंडळ ’ काढलें असतें तर किती छान झालें असतें. आपण गुजरातला याल त्यावेळीं ही बाब हातीं घेऊन गुजरातच्या स्त्रियांना मार्ग दाखवावा अशी माझी विनंति आहे.

“ आमचे डॉक्टर आणि वैद्य लोक धंदा बुडेल या भीतीनें संयमाची बाजू उचलून धरण्याला कचरतात. हें नवें वेड जर असेंच चालूं दिलें तर समाजाला नाशाच्या खाईकडे नेल्यावांचून तें राहणार नाहीं, हें त्यांना समजत नाहींसें दिसतें. फक्त संयमनाचा रामबाण उपाय वेळींच अमलांत आणल्यानें हा निश्चित होणारा नाश टळेल. कृत्रिम साधनांच्या सार्वत्रिक उपयोगानें देश स्वेच्छाचाराच्या आणि भ्रष्टाचाराच्याच गोत्यांत सांपडणें आणि त्यामुळें कधींहि न संपणारी रोगराई आणि दैन्यावस्था येणें हें अपरिहार्य आहे. ”

प्रस्तुत प्रश्नासंबंधीं माझीं जीं मतें आहेत असें पत्रलेखकानें म्हटलें आहे, तीं माझीं पक्कीं मतें आहेत हें प्रसिद्ध आहे. कृत्रिम साधनांचें मूळ जेथें रुजलें आहे, तेथें त्यांच्यामुळें असंख्य दुष्परिणाम झाले आहेत, हें ज्याचें त्यालासुद्धां कळून येण्यासारखें आहे. पण संततिनियमनाच्या पुरस्कर्त्यांचें या गोष्टीकडे लक्ष जात नाहीं. कारण स्वैराचार हा स्वभावतः चांगलाच आहे असें ते समजतात; आणि म्हणून संततिनियमनाच्या साधनांचा प्रसार नैतिक दृष्ट्या इष्ट आहे, अशी ते आपली समजूत करून घेतात.

स्त्री-पुरुषांना बिनधोकपणें अमर्याद भोग भोगतां यावा यासाठीं संततिनियमनाच्या आधुनिक साहित्याचा पुरस्कार अहमदाबादचें मंडळ करीत आहे असें जें पत्रलेखकानें म्हटलें आहे, तें थोडें अतिशयोक्तीचें आहे असें मला वाटतें. पण सदर मंडळाच्या पुरस्कर्त्यांचे हेतू कितीहि चांगले असले, तरी त्यांच्या कृतीमुळें स्वैराचाराचें पाप मात्र वाढणार यांत शंका नाहीं. कारण पाणी जसें उंचावरून खालीं धांवतें, तसा कृत्रिम साधनांच्या

वापराचा परिणाम स्वैराचारासाठीं अधःपतनांतच होणार.

त्याचप्रमाणें पत्रलेखक जें म्हणतो कीं, आपला धंदा बुडेल या भीतीनें डॉक्टर आणि वैद्य हे संयमाचें महत्त्व लोकांच्या मनावर बिंबवीत नाहींत हें त्यांना अन्याय करण्यासारखें आहे. वस्तुस्थिति अशी आहे कीं, संयमाचा विषय हा आपल्या क्षेत्रांतला नाहीं असेंच आजवर वैद्यकीय धंदा करणारे लोक समजत आले आहेत. पण या त्यांच्या मतांत शुभसूचक बदल घडून येत असल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. रोगाच्या कारणाचा आणि त्यावरील उपायाचा शोध हेंच ध्येय वैद्यकशास्त्रानें आपल्यापुढें ठेवलें आहे. या ध्येयाचा जर प्रामाणिकपणें पाठपुरावा झाला, तर त्या शास्त्राला स्वैराचार आणि संयमनाचा अभाव हें अनेक रोगांचें प्रमुख कारण आहे याच निर्णयावर शेवटीं आल्यावांचून गत्यंतर नाहीं. कारण, जसजसें ज्ञान आणि निरीक्षणशक्ति वाढत जाईल, तसतसें समाजाला फक्त रोग बरा व्हावा याऐवजीं रोगाचीं मूळ कारणें काढून टाकून रोगाला प्रतिबंध करण्याचाच आग्रह धरण्यावांचून गत्यंतर उरणार नाहीं. लोक जर संयमाचा प्राथमिक नियम पाळायला शिकले नाहींत, तर रोगाचें संपूर्ण उच्चाटण होणें सर्वस्वीं अशक्य कोटींतलि आहे. ही गोष्ट इतकी उघड आहे कीं, ती पटायला वेळ लागूं नये; आणि एकदां ती पटली कीं वैद्यकीय धंदा करणारे लोक जीवित आरोग्यपूर्ण होण्याच्या बाबतींत एक आवश्यक गोष्ट म्हणून संयमावर आपोआप जोर देऊं लागतील. अहमदाबादच्या 'संतति नियमन मंडळा'नें समजून घ्यावें कीं, कृत्रिम साधनांच्या ज्ञानाचा आणि उपयोगाचा प्रचार होण्यानें स्वैराचाराची आणि भ्रष्टाचाराची, आणि त्यांचींच न चुकणारीं भावंडें जीं दैन्य आणि रोगराई यांची, वाढ होण्यालाच फक्त मदत होणार आहे. म्हणून सदर मंडळाच्या पुरस्कर्त्यांना माझी कळकळीची सूचना आहे कीं, ते जर आपला वेळ आणि शक्ति स्वैराचाराचे दुष्परिणाम काय

होतात याचा खोलपणें अभ्यास करण्याकडे लावतील, आणि संततिनियमनाकरितां इंद्रियसंयम हाच आवश्यक व नैसर्गिक उपाय आहे ही गोष्ट स्त्रियांच्या मनावर बिंबवून देतील, तर आपलं ध्येय गांठण्याची अत्युत्कृष्ट व अगदीं शीघ्र फलदायी पद्धति आपण शोधून काढली, असा त्यांना अनुभव येईल.

हरिजन : १२-१२-१९३६

---

## एका तरुणापुढील प्रश्न : : १८

(एम्. ए. चा अभ्यास करणाऱ्या एका २१ वर्षें वयाच्या विवाहित विद्यार्थ्यानें गांधीजींना एक पत्र लिहिलें. त्यांतील फक्त ब्रह्मचर्याविषयींचा भाग आणि त्याला गांधीजींनीं दिलेलें उत्तर या ठिकाणीं उध्दृत केलें आहे.)

विद्यार्थी लिहितो :

"माझी सांसारिक जबाबदारी मोठी आणि आर्थिक परिस्थिति हलाखीची असतांना मीं संततिनियमनाचीं कृत्रिम साधनें वापरण्याला तुमची हरकत आहे काय ? इंद्रियांवर ताबा ठेवला पाहिजे, ब्रह्मचर्य पाळलें पाहिजे, या गोष्टीवर माझा विश्वास आहे. पण मी ब्रह्मचारी बनेपर्यंत कांहीं काळ तरी गेला पाहिजे. स्वतःवर ताबा आलेला नाहीं तोंवर मीं जर हीं साधनें वापरलीं नाहींत, तर मला आणखी मुलें होतील आणि माझी आर्थिक परिस्थिति अधिकच खालावेल. शिवाय, माझ्या पत्नीची

प्रकृति चांगली निकोप आहे. अशा स्थितींत तिच्या नैसर्गिक निरोगी वासनांवर कडक संयमाचें बंधन घालणें तिच्या हिताच्या दृष्टीनें योग्य ठरणार नाहीं असें मला वाटतें. सर्वसाधारण निकोप प्रकृतीच्या स्त्री-पुरुषांच्या जीवनांत कामवासनेला योग्य स्थान आहेच. मीहि त्याला अपवाद नाहीं; आणि माझी पत्नी तर तुमचे ब्रह्मचर्यावरील आणि स्वैराचाराच्या दुष्परिणामांवरील मोठमोठे लेख वाचून समजण्यालाहि लायक नाहीं; मग ती अपवाद कशी होणार ? ”

सदर विद्यार्थ्याची अडचण केवळ काल्पनिक आहे. आपल्या पत्नीच्या बुद्धीची लायकी कमी समजण्यांत त्याची चूक आहे. जर ती सर्वसाधारण स्त्रियांमधलीच एक असेल, तर ती त्याच्या संयमाच्या बेताला चटकन् रुकार देईल याविषयीं मला शंका नाहीं. त्यानें स्वतःच्या बाबतींत प्रामाणिक राहावें आणि आपल्यांत भरपूर संयमशक्ति आहे कीं नाहीं तेवढें पहावें. माझ्यापाशीं जो कांहीं पुरावा आहे त्यावरून असें दिसतें कीं, स्त्रीपेक्षां पुरुषांतच संयमाच्या शक्तीचा अभाव असतो. पण संयम पाळण्याच्या बाबतींत आपली शक्ति अल्प आहे असेंहि त्यानें समजण्याचें कारण नाहीं. कुटुंब वाढलें तर त्याला मर्दपणानें त्यानें तोंड द्यावें आणि त्याचें पालनपोषण करण्याचा जास्तींत जास्त चांगला मार्ग शोधून काढावा. संततिनियमनाचीं कृत्रिम साधनें माहीत नाहींत अशा करोडों लोकांशीं तुलना करतां तीं साधनें वापरणारे कांहीं थोडे हजार लोकच आहेत. या करोडों लोकांना मुलें पाहिजेच असतात असें नाहीं; पण त्यांना पोसण्याची या लोकांना भीति वाटत नाहीं. आपल्या कृतींचे परिणाम भोगण्याचें नाकारणें म्हणजे भ्याडपणा आहे. कृत्रिम साधनें वापरणारीं माणसें कधींहि संयम शिकणार नाहींत. त्यांना त्याची गरजच भासणार नाहीं. कृत्रिम साधनें वापरून स्वैराचार केल्यानें संतति होणार नाहीं; पण त्यायोगें स्त्रियांची व पुरुषांची दोघांचीहि जीवनशक्ति निपटून टाकली जाईल. स्त्रियांपेक्षां कदाचित् पुरुषांचीच अधिक नष्ट

होईल. विकाररूपी सैतानाशीं झगडणें नको म्हणणें हें भित्रेपणाचें आहे. नको असलेली संतति टाळण्याचा एकमात्र आणि सन्मान्य मार्ग म्हणजे संयम हाच होय असा पत्रलेखकानें मनाशीं निश्चय करावा. त्याला आणि त्याच्या पत्नीला शंभर वेळां अपयश आलें तरी काय झालें ? आनंद हा झगडण्यांत असतो. परिणाम ईश्वराच्या कृपेवर अवलंबून आहे.

हरिजन : १७-४-१९३७

---

## अमेरिकेंतील एक साक्षीदार : : १९

मोंटान ( अमेरिका ) हून मिस् मॅबेल ई. सिम्प्सन या बाई संपादकाला लिहितात :

" मि. गांधींचा संततिनियमावरील लेख वाचून मला फार आनंद झाला. त्या लेखांत त्यांची नेहमींची वस्तूंचा गाभा पारखण्याची स्वच्छ दृष्टि दिसून येते. वीस वर्षांपूर्वी संततिनियमनाचा ज्यावेळीं अमेरिकेंत निषेध झाला होता, त्यावेळीं आणि आज संतातीनियमन जेव्हां अगदीं भरवेगांत सुरू आहे, अशा वेळीं जर त्यांनीं अमेरिकेस भेट दिली असती, तर त्यांना त्याच्यामुळें नैतिक ऱ्हास होतो हें प्रत्यक्ष कळून आलें असतें. पण त्यांना तें कोणालाहि पटवून देतां येणार नाहीं. कारण, त्याच्या योगानें नैतिक आणि आध्यात्मिक दृष्टीवर एक प्रकारचा पडदाहि येतो. त्यामुळें संततिनियमनाच्या अनुयायांना उच्च अशा नीतीला आणि अध्यात्माला धरून सूक्ष्म भेद करण्याची शक्तीच राहात नाहीं. याबाबतींत हिंदुस्थान जर पश्चिमेचें अनुकरण करील, तर तें खात्रीनें आपलीं दोन अत्यंत बहुमोल आणि सुंदर रत्नें गमावून बसेल ! तीं रत्नें म्हणजे लहान मुलांच्या

विषयींची ममता आणि मातृपितृत्वाविषयींचा आदरभाव. अमेरिकेनें दोन्हींहि गमावलीं आहेत आणि तें तिला कळत नाहीं. ब्रह्मचर्याचा अर्थ सांगणारें एकादें पत्रक तुम्ही छापून पाठवाल कां ? मला लोक विचारतात, आणि मला जरी त्याची कल्पना आहे; तरी ती मी दुसऱ्यांना समजावून देऊं शकेन कीं नाहीं कुणास ठाऊक. धन्यवाद."

या पुराव्याला किती किंमत द्यावयाची तें वाचकांनींच ठरवावें. पण मला असें सुचवावेसें वाटतें कीं, कृत्रिम साधनांच्या विरुद्ध असलेला हा पुरावा 'त्यांच्या उपयोगानें आमचें हित होत आहे' असें म्हणणाऱ्यांच्या पुराव्यापेक्षां अधिक महत्त्वाचा आहे. कारण उघड आहे. त्या साधनांनीं मुलें होणें पुष्कळ वेळां थांबतें. या अर्थीं त्यापासून होणारें हित नाकबूल नाहीं. तक्रार आहे ती ही कीं, त्यांच्या वापरानें जी नैतिक हानि होते ती कल्पनातीत आहे. मिस् सिम्प्सन् यांनीं अशा तऱ्हेच्या हानीचें एक माप आपल्याला दिलें आहे.

आतां ब्रह्मचर्याच्या व्याख्येसंबंधीं किंवा अर्थासंबंधीं त्याचा धात्वर्थ 'ब्रह्माच्या म्हणजे ईश्वराच्या समीप ठेवणारी चर्या म्हणजे वागणूक' असा देतां येईल.

या वागणुकींत सर्व इंद्रियांचा संपूर्ण संयम येतो, हाच त्या शब्दाचा खरा आणि बरोबर लागू पडणारा अर्थ आहे.

लोकांमध्यें या शब्दाचा 'केवळ जननेंद्रियावरील बाह्य संयम' एवढाच अर्थ रूढ झाला आहे. या संकुचित अर्थामुळें ब्रह्मचर्याची किंमत कमी केली गेली आहे आणि त्याचें पालन निव्वळ अशक्य करून सोडलें आहे. सर्व इंद्रियांच्या योग्य अशा संयमावांचून जननेंद्रियाचा संयम अशक्य आहे. तीं सर्व परस्परावलंबी इंद्रियें आहेत. स्थल (खालच्या पातळीवरील) मनाचा इंद्रियांतच समावेश केला जातो. मनावर ताबा नसेल, तर निव्वळ बाह्य निग्रह, जरी तो कांहीं काळ साधला तरी, फारसा किंवा मुळींच उपयोगाचा नाहीं.

हरिजन : १३-६-१९३६

## मिसेस् सँगर आणि गांधीजी : : २०

मिसेस् मार्गरेट सँगर या संततिनियमन–चळवळीच्या एक प्रसिद्ध पुढारी बाई आहेत. बायकांना इच्छा नसतांनासुद्धां वारंवार बाळंत होण्याच्या प्रसंगांतून सोडविण्याकरितां संततिनियमन करणें व त्यासाठीं कृत्रिम साधनांचें साह्य घेणें या गोष्टींचा त्या प्रचार करीत असतात. हिंदुस्थानांतील कोट्यवधि स्त्रियांस आपला हा संदेश देण्याकरितां त्या येथें आल्या होत्या त्यावेळीं त्या गांधीजींनाहि जाऊन भेटल्या, आणि एक मोठा समाजसेवक धर्मपुरुष या नात्यानें त्यांचें या बाबतींत आपल्याला कुठवर साह्य मिळेल, यासंबंधीं त्यांच्याशीं त्यांनीं चर्चा केली. वारंवार होणाऱ्या गरोदरपणाचा स्त्रियांना फार त्रास होतो, पण नवऱ्यापुढें त्यांचें कांहीं चालत नाहीं, स्त्रियांची यांतून मुक्तता झाली पाहिजे, स्वतःचें भवितव्य ठरविण्याचा त्यांचा त्यांनाच हक्क असला पाहिजे, येथपर्यंत गांधीजींचा मिसेस् सँगर यांना पूर्ण पाठिंबा आहे. हें संततिनियमन कृत्रिम उपायांनीं न करितां ब्रह्मचर्यपालनाच्या द्वाराच करणें इष्ट आहे, असें गांधीजींचें म्हणणें. आणि मिसेस् सँगर तें स्वीकारण्याला तयार नाहींत. या बाबतींत त्यांची गांधीजींशीं झालेली मुलाखत खालीं दिली आहे:—

या मुलाखतींत गांधीजींनीं आपलें संपूर्ण अंतरंग बाईच्यापुढें उघड केलें आणि आपल्या खासगी जीवनांतीलहि कांहीं गोष्टी त्यांनीं त्यांना सांगितल्या; आणि म्हणाले कीं, " मला जर तुम्ही उपायासंबंधीं विचाराल, तर ' आत्मसंयमनाच्या द्वारा आत्मसाक्षात्कार ' हा माझा जीवनसिद्धांत ठरून गेला असल्यामुळें मी दुसरा उपाय सुचवूंच शकणार नाहीं." पण सँगरबाईंना हा उपाय अशक्यप्राय वाटला. "हिंदुस्थानच्या स्त्रियांना

अशक्य असें कांहींतरी करायला गांधीजी सांगत आहेत, नवऱ्यांना ' नाहीं ' म्हणणें बायकांना शक्यच होणार नाहीं, गांधी हिंदी स्त्रियांचा स्वभाव ओळखीत नाहींत ' असें त्यांनीं आपलें मत पुढें आपल्या जाहीर निवेदनांत प्रकट केलें. असो. गांधीजी काय म्हणाले तें पाहूं. ते म्हणाले:—

" स्त्रियांच्या स्वभाव–परीक्षणाचें क्षेत्र मीं माझ्या पत्नीला बनविलें. तिच्यामध्यें मीं साऱ्या स्त्रीजातीचा अभ्यास केला. दक्षिण अफ्रिकेंत असतांना मी अनेक युरोपियन स्त्रियांच्या सान्निध्यांत आलों होतों, आणि हिंदी स्त्रीला ओळखीत होतों. त्यांच्याबरोबर मीं काम केलें. राजकारणाच्या क्षेत्रांतच नव्हे, तर घरगुती क्षेत्रांतहि तुम्ही आपल्या आई-बापांच्या गुलाम नाहीं, हें त्यांच्यावर बिंबविण्याचा मीं प्रयत्न केला. पण अडचण ही होती कीं, कित्येकजणी आपल्या नवऱ्यांचा प्रतिकार करूं शकत नव्हत्या. त्याला उपाय खुद्द स्त्रियांच्याच हातीं. हा झगडा त्यांना फार कष्टदायक आहे हें मला कबूल आहे आणि त्याबद्दल मी त्यांना दोष देत नाहीं. मी पुरुषांना दोष देतों. पुरुषांनीं त्यांच्याविरुद्ध कायदे केले आहेत. पुरुष स्त्रीला आपलें साधन मानीत आला आहे. तीहि त्याचें साधन बनायला शिकली आणि अंतीं तेंच तिला स्वाभाविक आणि सुखकर वाटूं लागलें. कारण, एकजण जेव्हां दुसऱ्याला आपल्याबरोबर खालीं ओढतो, तेव्हां हें अधःपतन सहज होतें...जेवढें आयुष्य राहिलें आहे तेवढ्या आयुष्यांत ' तुम्ही स्वतंत्र आहांत ' हें सत्य जर स्त्रियांच्या मनावर मी ठसवूं शकलों, तर हिंदुस्थानांत संतति-नियमनाचा प्रश्नच उद्भवणार नाहीं असें मला वाटूं लागलें आहे. पुरुष स्त्रियांच्या जवळ कामभावनेनें येतात, तेव्हां त्यांना ' नाहीं ' म्हणायला फक्त जर त्या शिकल्या, तर मला नाहीं वाटत कीं सर्वच पुरुष पशू असतात; आणि जर स्त्रियांना प्रतिकार कसा करायचा याचें ज्ञान झालें, तर सर्व कांहीं सुरळीत होईल. माझ्या सहवासांत आलेल्या स्त्रियांना

आपल्या नवऱ्यांचा त्यांनीं कसा प्रतिकार करावा, हें मी शिकवूं शकलों आहें. खरा प्रश्न असा आहे कीं, पुष्कळजणींना प्रतिकार करण्याची इच्छाच नसते......पति-पत्नींचें दोघांचेंहि बिनसेल इतक्यापर्यंत प्रतिकार करण्याचें शेंकडा ९९ बाबतींत कारणच पडत नाहीं. 'नको, मला तें नको आहे' असें बायकोनें नवऱ्याला जर निक्षून सांगितलें, तर त्याच्याकडून त्रास होणार नाहीं. पण तिला तसें शिक्षणच मिळालेलें नाहीं. पुष्कळ वेळीं तिचे आईबाप तिला हें शिक्षण देत नाहींत. कांहीं उदाहरणें अशीं मला माहीत आहेत कीं, ज्या ठिकाणीं आईबापांनीं आपल्या मुलीच्या नवऱ्याला तिच्यावर सक्तीनें मातृपद न लादण्याबद्दल आर्जवून सांगितलें आहे. आणि मला तसे समजूतदार नवरेहि भेटले आहेत. स्त्रीनें प्रतिकाराचा आपला प्राथमिक हक्क गाजवायला शिकावें अशी माझी इच्छा आहे. तिला वाटतें, आपल्याला तो हक्क नाहीं.

पण सँगरबाईंना वाटतें कीं, अशा आत्मसंयमनाच्या आचरणामुळें कुटुंबांत चिरड, झगडे उत्पन्न होतील; मग पतिपत्नींमधील प्रेमळ वागणूक नाहींशी होईल. पण सँगरबाई विसरतात कीं, संततिनियमन आणि 'चुंबनें' इ. त्याचेच कोमल किंवा हलकट सोबती आल्यामुळें अमेरिकेंत अनंत झगडे, कुलंगडीं, काडीमोड आणि अशाच इतर भानगडी निर्माण झाल्या आहेत. ( आत्मसंयमनामुळें मज्जातंतूंचा आणि डोक्याचा बिघाड झाल्याचीं उदाहरणें त्यांनीं दाखवून दिलीं. तेव्हां गांधीजी म्हणाले ) 'हीं उदाहरणें म्हणजे वेडसर माणसांची तपासणी करून काढलेला पुरावा आहे. निरोगी मनाच्या माणसांच्या आचारावरून कांहीं हे निर्णय काढलेले नाहींत. उदाहरणादाखल म्हणून घेतलेल्या लोकांनीं माफक प्रमाणांतसुद्धां ब्रह्मचर्य पाळलेलें नाहीं ! हे मज्जातंतुविशारद समजून चालतात कीं, अनिर्बंध-असंयमी जीवन चालू असतांनाच लोकांनीं संयम पाळला पाहिजे. याचा परिणाम म्हणजे ते संयम पाळीत नाहींतच पण वेडे मात्र बनतात. अशा पुष्कळ लोकांशीं माझा पत्रव्यवहार चालू आहे

आणि ते आपलीं दुःखें मला निवेदन करतात. मीं त्यांना जर संतति-नियमनाची ही ( कृत्रिम ) पद्धति सांगितली, तर त्यांचें जीवन याहूनहि भयंकर होईल. ”

ज्या पतिपत्नींना कामप्रेरणा आवरावीशी वाटते, पण तें शक्य होत नाहीं, त्यांच्या बाबतींत काय करावें ?

याविषयींच्या संभाषणांतूनच पुढें प्रीति आणि आसक्ति यांमधील भेद गांधीजींनीं विशद करून सांगितला. ते म्हणाले :

“ जेव्हां दोघांनाहि आपला विकार तृप्त करून घ्यावासा वाटतो, पण त्या कृतीचे परिणाम भोगण्याची मात्र इच्छा नसते, तेव्हां ती प्रीति नाहीं, ती कामासक्ति आहे. पण प्रीति जर शुद्ध असेल,तर ती विकारावर मात करील आणि स्वतःला मर्यादेंत ठेवील. विकाराच्या बाबतींत आपल्याला पुरेसें शिक्षण मिळालेलें नाहीं. ‘ आपल्याला संतति नको, पण आपण संबंध ठेवूं या ’ असें जेव्हां नवरा म्हणतो, तेव्हां तो त्याचा पाशवी विकार नव्हे तर काय ? त्यांना जर अधिक संतति नको असेल, तर त्यांनीं संबंध ठेवण्याचें सोडून दिलें पाहिजे. प्रीति ज्या क्षणीं पाशवी गरजांच्या पूर्तीचें साधन बनतें, त्याचक्षणीं ती लालसा बनते. अन्नाच्या बाबतींत असेंच आहे. अन्न केवळ चैनीकरितां म्हणून खाल्लें जातें, तेव्हां ती लालसा असते. भूक भागविण्याकरितां कांहीं तुम्ही चॉकोलेट खात नाहीं. तुम्ही तें चैनीकरितां खातां आणि मग डॉक्टराकडे जाऊन औषध मागतां. ‘ व्हिस्कीनें माझें डोकें सुंद होतें,’ असेंहि कदाचित् तुम्ही डॉक्टराला सांगाल आणि तो तुम्हांला औषध देईल. पण व्हिस्की किंवा चाकोलेट न घेणें हेंच अधिक चांगलें नव्हे काय ? ”

सँगरबाई:— मला ही उपमा कबूल नाहीं.

गांधीजी:— बरोबर, बरोबर ! संतति न होतां कामभावना प्रकट होणें ही आत्म्याची गरज असें तुम्ही समजतां; मग तुम्हांला ही उपमा कशी कबूल होईल ? मला मात्र तसें वाटत नाहीं.

सँगरबाई:— होय, कामभावनेचें प्रकटीकरण ही आत्म्याची गरज आहे. आणि म्हणून माझें म्हणणें असें आहे कीं, परिणामापेक्षां या प्रकटीकरणाचा जो स्वभावधर्म त्याला जास्त महत्त्व आहे. कारण परिणाम कांहींहि झाले, तरी पतिपत्नींची संबद्धता हा मुळीं स्वभावच आहे. पुष्कळशीं मुलें कर्मधर्मसंयोगानें जन्माला येतात, आईबापांना गर्भधारणेचा इच्छाहि नसते. संभोगक्रियेमध्यें मुलें व्हावींत या इच्छेनें क्वचित्च स्त्रीपुरुष ओढले जातात... ..स्त्रीपुरुष दोघांचें एकमेकांवर प्रेम आहे, दोघांचें एकत्र जीवन एकमेकांना सुखकर आहे, अशा स्त्री–पुरुषांना दोन वर्षांतून फक्त एकदांच संग करणें—म्हणजे त्यांना जेव्हां मुलाची इच्छा होईल त्याचवेळीं त्यांनीं संग करणें—शक्य आहे, असें तुम्हांला वाटतें काय ?

गांधीजी: — नेमकी तीच गोष्ट माझ्या बाबतींत घडली आहे, आणि माझेंच एकट्याचें तसें उदाहरण आहे असें नाहीं.

केवळ संततीकरितांच संग घडणें हें प्रेम, आणि कामक्षुधा भागविण्या-करितां संग करणें ही लालसा, असें म्हणणें हें तर्कशास्त्रदृष्ट्या बरोबर नाहीं; कारण दोन्हींमध्यें क्रिया एकच घडते, हा सँगरबाईचा विचार. गांधीजींनीं तें तावडतोब कबूल केलें. ते म्हणाले, “स्त्रीपुरुषसंग हा कामलालसेच्याच जातीचा असें म्हणायला माझी कांहींच हरकत नाहीं.” त्यांनीं आपल्या स्वतःच्या जीवनामध्यें घडलेलीं उदाहरणें देऊन तें पूर्ण स्पष्ट केलें. “माझ्या पत्नीकडे मी लालसेनें जोंवर पहात होतों, तोंवर आम्हां दोघांमध्यें मेळ नसे. आमचें प्रेम उच्च भूमिकेवर चढलें नव्हतें. आम्हांला एकमेकांविषयीं आपलेपणा नेहमींच वाटे, पण आम्ही—किंवा खरें म्हटलें तर मीच—जेव्हां संयमी बनलों, तेव्हांच आम्ही एकमेकांच्या अधिकाधिक जवळजवळ जाऊं लागलों. माझ्या पत्नीच्या बाजूनें संयमाच्या बाबतींत कधींहि नाखुषी नव्हती. पुष्कळ वेळां ती संयम दाखवीत असे. पण जरी

तिनें अनेक वेळां आपली अनिच्छा दाखविली, तरी तिनें मला प्रतिकार कधीं फारसा केला नाहीं. तिच्यापासून इंद्रियतृप्ति जोंवर मी इच्छीत होतों, तोंवर मी तिची सेवा करूं शकलों नाहीं. पण ज्याक्षणीं मीं इंद्रियासक्त जीवनाला रामराम ठोकला, त्याचक्षणापासून आमचे संबंध आध्यात्मिक झाले. लालसा मेली आणि प्रीतीचें साम्राज्य सुरू झालें."

सँगरबाईनीं विचारलें, "स्त्रीपुरुषसंग सबंध आयुष्यांत फक्त तीन किंवा चार वेळांच घडावा काय?"

गांधीजी म्हणाले, "तीन किंवा चार मुलांपेक्षां जास्त मुलें असणें अनीतिकारक आहे आणि तितकीं मुलें झालीं, कीं पति पत्नींनीं आपली शय्या वेगळी करावी, असें लोकांना कां शिकविलें जाऊं नये? त्यांना जर हें शिकविलें, तर तीच पुढें रूढी पडेल. आणि समाजसुधारक जर लोकांच्या मनावर ही गोष्ट ठसवूं शकले नाहींत, *तर असा कायदाच कां करूं नये? पतिपत्नींना जर चार मुलें झालीं, तर त्यांना भरपूर संगसुख मिळालें म्हटलें पाहिजे. त्यानंतर त्यांचें प्रेम उच्च भूमिकेवर गेलें पाहिजे. त्यांचीं शरीरें मिळालीं. त्यांना हवीं तेवढीं मुलें झाल्यानंतर त्यांच्या प्रेमाचें आध्यात्मिक संबंधांत रूपांतर झालें पाहिजे. हीं मुलें मेलीं आणि त्यांना आणखी पाहिजे असलीं, तर त्यांनीं खुशाल पुनः संग करावा. इतर विकारांचे गुलाम नसतांना लोकांनीं याच विकाराचे गुलाम कां होऊन बसावें? संततिनियमनाचें तुम्ही जेव्हां त्यांना शिक्षण देतां, तेव्हां तुम्ही त्यांना संग हें कर्तव्यकर्म आहे असें सांगतां. तुम्ही म्हणतां कीं, जर त्यांनीं ही गोष्ट केली नाहीं, तर त्यांच्या आध्यात्मिक उन्नतींत अडथळा येईल. तुम्ही 'नियमित संग करा,' अससुद्धां म्हणत नाहीं. संततिनियमाचें शिक्षण दिल्यानंतर 'बस्स, याच्यापुढें जायचें नाहीं' असें तुम्ही त्यांना सांगत नाहीं. लोकांना तुम्ही माफक प्रमाणांत दारू प्यायला सांगणार! जणुं काय

माफक प्रमाण राहाण हातांतलेंच आहे ! मला हे माफक पिणारे माहीत आहेत."

आणि गांधींजींचें असें मत आहे तरीसुद्धां सँगरबाईंची भयंकर कळकळ पाहून गांधीजींनीं आपल्याला पटणारा एक उपाय सांगितला. तो उपाय म्हणजे असुरक्षित कालावधींत संग टाळणें, आणि महिन्यांतून दहा दिवस जो 'सुरक्षित' काळ मानला आहे त्या काळापुरताच संग करणें. यामध्यें असुरक्षित काळांत पाळायचा कांहीं ना कांहीं संयम म्हणून तरी आहे. आणि सत्यशोधक गांधींचें यांतच वैशिष्ट्य आहे.

[ महादेव देसाई यांच्या लेखाचा योग्य तेवढा संक्षेप करून ]

हरिजन : २५-१-१९३६

---

## गर्भनिरोधनाच्या कृत्रिम साधनांसंबंधीं : २१

एक पत्रलेखक लिहितात :

" 'हरिजन' मध्यें नुकतीच महात्मा गांधी आणि मिसेस् सँगर यांची जी मुलाखत प्रसिद्ध झाली आहे, त्यासंबंधीं मला थोडें सांगावयाचें आहे.

या मुलाखतींत एक गोष्ट चर्चिण्याची राहून गेली आहे असें मला वाटतें. ती ही कीं, मनुष्य हा मुख्यत्वेंकरून कलावंत आणि उत्पादक आहे, ही गोष्ट लक्षांतच घेतली गेलेली नाहीं. निव्वळ गरजेच्या वस्तूंनीं त्याचें समाधान होत नाहीं; तर त्याला सौंदर्याची, रंगाची आणि मोहकपणाचीहि आवश्यकता वाटते. 'तुझ्याजवळ एकच पैसा असेल तर त्याची भाकर घे; दोन असतील तर एकाची भाकर घे आणि

एकाचें फूल घे,' असें महंमद पैगंबरांनीं सांगितलें. यांत एक मोठें मानसशास्त्रीय सत्य गोवलें गेलें आहे. तें हें कीं, मनुष्य हा स्वभावतःच कलावन्त आहे. म्हणूनच तो आपलें शरीररक्षणापुरतेंच जेवढें वस्त्र लागेल त्याहून कांहीं ना कांहीं अधिक करण्यांत गुंतलेला आपल्याला दिसून येतो. आपली प्रत्येक गरजेची वस्तु त्यानें कलात्मक बनविली आहे आणि तीवर त्यानें आपलें रक्त ओतलें आहे. त्याच्यांतील सृजन-प्रेरणा त्याच्या अडचणी आणि कोडीं वाढवावयाला लावते आणि तीं पुनः पुनः सोडवावयाला लावते. रूसो, रस्किन, टॉल्स्टॉय, थोरो आणि गांधीजी हे लोक मानवप्राणी हा जसा 'साधाभोळा' असावा असें म्हणतात, तसा तो होऊंच शकत नाहीं. उत्पत्ति आली कीं तिला आनुषंगिक असें युद्धहि त्याला अवश्य पाहिजेच आणि त्यालासुद्धां त्यानें मोठ्या कलेचें रूप दिलें आहे.

'निसर्गाचा कित्ता धरून चाल' असें त्याला सांगणें व्यर्थ आहे. कारण तें मुळीं त्याच्या प्रकृतीच्याच अगदीं विरुद्ध आहे. 'निसर्ग' त्याचा शिक्षक होऊंच शकत नाहीं. जे निसर्गाकडे कित्ता म्हणून पहायला जातात त्यांच्या हें लक्षांत येत नाहीं कीं, निसर्गामध्यें फक्त डोंगर, दऱ्याखोरीं आणि फुलांचे ताटवेच नाहींत, तर महापूर, झंझावात आणि भूकंप हेसुद्धां त्यांत आहेत. रूढ समजुती मोडून टाकणारा जर्मन तत्त्वज्ञ नीत्शे म्हणतो :—' कलात्मक दृष्टीनें निसर्ग हा कांहीं आपला कित्ता नव्हे. तो प्रमाणबद्धता पाळीत नाहीं, स्वरूपाला विरूप करतो, एकाची दुसऱ्याशीं सांगड न बांधतां मध्यें खिंडारें ठेवतो. 'निसर्गामधून अभ्यास' हे माझ्या मतें दुर्लक्षण आहे; अशा प्रकारें क्षुल्लक घटनांपुढें नमन जाणें हें जातिवंत कलावंताला शोभणारें नाहीं. विचारशक्तीच्या दुसऱ्या प्रणालीचें, जें कलात्मविरोधी आहे त्याचें, ज्याला 'प्रत्यक्ष' म्हणतात त्याचें, कार्य काय हें समजून घेण्यासाठीं आपण कोण हें जाणलें पाहिजे!'

जंगली पशू कच्चें मांस खातात तें आपलें शरीर टिकविण्याच्या गरजेमुळें, चवीकरितां म्हणून नव्हे, हें आपल्याला माहीत आहे. आपण हेंहि जाणतों कीं, निसर्गानें जनावरांत माज येण्याचा विशिष्ट काळ ठेवलेला आहे, या काळाशिवाय त्यांच्यांत संग होत नाहीं. पण पुनः त्याच तत्त्वज्ञानाच्या भाषेंत सांगायचें, तर ही गोष्ट अभिजात कलावंताला न साजणारी आहे, आणि मनुष्य तर निसर्गतःच कलावंत आहे. संततीची इच्छा नसली कीं संग बंद, संततीची इच्छा झाली तरच तो करावयाचा, असा नियम घालून देणें हें इतकें हिशेबी, इतकें निसर्गनिष्ठ, किंवा आमचा तत्त्वज्ञ म्हणाला त्याप्रमाणें इतकें 'प्रत्यक्ष' आहे कीं, मनुष्याच्या जबरदस्त कलावृत्तीला तें पटणारच नाहीं. म्हणून स्त्रीपुरुषप्रेमासंबंधीं त्याची अगदीं वेगळीच दृष्टि आहे. हें प्रेम संततिवृद्धीच्या इच्छेहून स्वतंत्र आहे असें हॅवेलॉक एलिस व मेरी स्टोप्ससारख्या अधिकारी व्यक्तींनीं उघड करून सांगितलें आहे. पण, जरी हें प्रेम आत्म्यामध्यें उगम पावत असलें, तरी जोंवर तो आत्मा स्वतंत्र रीत्या आपल्याला मिळत नाहीं, तो शरीरसाधनाच्या द्वाराच मिळतो, तोंवर शरीरसंगमावांचून तें प्रेम अपूर्णच राहतें. अशा संगमापासून घडणाऱ्या परिणामाला कसें तोंड द्यावें हा अगदीं वेगळा मुद्दा आहे, आणि येथेंच संततिनियमनाच्या चळवळीचें कार्य आहे. पण या कार्याऐवजीं बाह्य शिस्तीच्या योगानें खुद्द आत्म्याचीच कांहीं नवीन व्यवस्था लावायची म्हटली—कारण 'संयम' म्हणजे याहून वेगळें कांहीं नाहीं—तर त्यामुळें आपल्याला हवत ते अर्थ साधतीलच अशी कांहीं खात्री नाहीं. संततिनियमनाची चळवळ हीसुद्धां कांहीं मानसशास्त्राच्या भक्कम पायावांचून उभारलेली नाहीं.

आणखी एक मत प्रदर्शित करून मी पुरें करतों; तें हें कीं, संयमाच्या शिस्तीचें किंवा शास्त्रीय परिभाषेंत ज्याला 'ब्रह्मचर्य' म्हणतात, त्याचें

मोल कमी लेखण्याचा माझा उद्देश नाहीं. कामप्रेरणेला ताब्यांत ठेवण्याची पूर्णत्वाला पोंचविलेली कला म्हणून मी ब्रह्मचर्याची नेहमीं प्रशंसाच करीन. तथापि, ज्याप्रमाणें इतर कलांची पूर्णता जीवनाच्या शास्त्रांत ( नीतिशेच्या भाषेत ) संपूर्ण जीवनांत, जीवनाच्या सर्व मूल्यांची जी एक आंखीव योजना आहे तिच्यांत, ढवळाढवळ करीत नाहीं, त्याचप्रमाणें ब्रह्मचर्याच्या आदर्शाच्या मूल्यालाहि इतर मूल्यांवर मी वर्चस्व गाजवूं देणार नाहीं; मग लोकसंख्येच्या वाढीसारखे महाप्रश्न सोडविण्याच्या बाबतींत त्याला साधन म्हणून वापरणें तर बाजूलाच राहिलें. आपण त्याचा केवढा मोठा बाऊ करून ठेवला आहे ! आपण 'युद्धसंतती' विषयीं ऐकलें आहे. ज्या सैनिकांनीं आपलें रक्त अर्पण करून आपल्या देशबांधवांकरितां जय मिळवून आणला, अशा सैनिकांचा त्यांच्याकडून युद्धसंतति निर्माण झाली म्हणून गौरव करण्याचें आपण नाकारावें काय? अर्थात् नाहीं. मूल्यांची ही योजना लक्षांत घेऊनच मला वाटतें प्रश्नोपनिषदांत म्हटलें आहे कीं, 'ब्रह्मचर्यमेव तद् यद् रात्रौ रत्या संयुज्यते,' रात्रीं घडणारा संग हा ब्रह्मचर्यच होय ( अर्थात् दिवसां होणारा गैरवाजवी संग अयुक्त असा याचा अर्थ ). या ठिकाणीं नित्याचा कामव्यवहार हा ब्रह्मचर्य म्हणूनच म्हटला आहे. त्याच्या विषयींची कडक कल्पना, आपण जेव्हां अगोदर जीवनाचीं सर्व मूल्येंच उलटींपालटीं करून टाकलीं, त्यानंतरच बनूं लागली."

हें पत्र मी आनंदानें प्रसिद्ध करीत आहें. या आणि अशा तऱ्हेच्या ज्या पत्रांत उपहास, शिवीगाळ किंवा उपरोध नाहीं अशीं पत्रें प्रसिद्ध करण्यास मला हरकत वाटत नाहीं. वाचकांपुढें या प्रश्नाच्या दोन्ही बाजू असाव्या, त्यामुळें त्याला निर्णय करणें शक्य होईल. जी वस्तु शास्त्रीय आणि उपकारक आहे असा दावा केला जातो, आणि जिला पुष्कळ नामवंत लोकांचा पाठिंबा आहे, अशा वस्तूच्या चांगल्या अंगाचा विचार करण्याचा

प्रयत्न करूनसुद्धां मला तिच्यापासून दूर व्हावेंसें कां वाटतें, हें जाणून घ्यावयाला मीसुद्धां उत्सुक आहें.

पतिपत्नींचा संग ही गोष्टच इतकी चांगली आहे, कीं तिचा दोघांनाहि फायदाच होतो, ही गोष्ट माझें समाधान होण्याइतपत सिद्ध झालेली नाहीं. किंबहुना, त्याचा उलटा परिणाम झाल्याचा मी माझ्या स्वतःच्या आणि पुष्कळ मित्रांच्या अनुभवावरून भरपूर पुरावा देऊं शकेन. आम्हांपैकीं कोणाचेंहि त्यापासून मानासिक, आध्यात्मिक किंवा शारीरिक हित झाल्याचें मला आठवत नाहीं. क्षणिक उत्तेजना आणि इच्छापूर्ति निःसंशय त्यांत मिळत होती. पण त्यामागून हटकून थकवा येईच. आणि थकव्याचा परिणाम कमी झाला, कीं लगेच पुनः संगाची इच्छा उत्पन्न होई. नेहमीं विवेकबुद्धीला स्मरून वागणारा असा कार्यकर्ता मी होतों, तरी हा असंयम माझ्या कामांत बाधा आणीत असे हें मला स्पष्टपणें स्मरतें. कार्याला पडणाऱ्या या बंधनाच्या जाणीवेनेंच मला संयमाचा मार्ग सुचला; आणि आज मी जो त्या मानानें दीर्घकाल प्रकृतीचा स्वस्थपणा अनुभवीत आहें त्याला, आणि प्रत्यक्ष पहाणाऱ्यांना असामान्य वाटणारी माझी जी शक्ति आणि कार्य दिसून येत आहे त्याला, माझा हा संयमच कारणीभूत आहे यांत तिळमात्र शंका नाहीं.

पत्रलेखकानें जें वाचलें, त्याचा भलता अर्थ लावलेला दिसतो. मनुष्य हा निःसंशय कलावंत आहे, निर्माता आहे. त्याला सौंदर्याची आणि म्हणून रंगाची प्राप्ति झाली पाहिजे खरी. आपल्या कलात्मक आणि सृजनशील स्वभावाच्या पूर्णावस्थेंत तो संयमांत कला आणि अनुत्पादक संगांत किळसवाणेपणा पहायला शिकला. कलात्मकतेविषयींच्या त्याच्या सहजप्रेरणेनें त्याला विवेक करावयाला आणि रंगांची कशाहि प्रकारची गर्दी म्हणजे कांहीं सौंदर्य नव्हे, किंवा इंद्रियसुख हें मुळांतच चांगलें आहे असें नव्हे, हें जाणण्याला शिकविलें. त्याच्या कलाशोधक दृष्टीनें

त्याला उपयोगितेंत आनंद पहावयाला शिकविल. अशा रीतीनें आपल्या उत्क्रांतीच्या प्रथमावस्थेंतच 'खाण्याकरितां खावयाचें नाहीं, ( जसें आजहि आपल्यापैकीं कांहींजण करींत असतात ) तर जगतां यावें म्हणून खावयाचें' हें त्याला समजून आलें. यानंतरच्या अवस्थेंत, केवळ जगण्याकरितां जगावयाचें यांत सौंदर्यहि नाहीं किंवा आनंदहि नाहीं, तर आपल्या बांधवांची सेवा करण्याकरितां आणि त्यांच्या द्वारा विधात्याची सेवा करण्याकरितां आपल्याला जगावयाचें आहे, हें तो आणखी शिकला. अशा प्रकारें जेव्हां त्यानें संगामध्यें सुख भासतें तें कां, या गोष्टीवर पुष्कळ विचार केला, तेव्हां त्याला आढळून आलें कीं, इतर इंद्रियांप्रमाणेंच जननेंद्रियाचासुद्धां सदुपयोग आहे, दुरुपयोगहि आहे. आणि त्याचें खरं कार्य, त्याचा रास्त उपयोग तें उत्पत्तीपुरतें मर्यादित करणें हाच आहे असें त्याला दिसलें. याव्यतिरिक्त दुसरा कोणताहि उपयोग त्याला गलिच्छ आढळून आला; आणि पुढें त्याला असेंहि दिसून आलें कीं, अशा तऱ्हेच्या दुरुपयोगाचा भयंकर परिणाम व्यक्तीलाच भोगाला लागतो असें नव्हे, तर समाजालाहि भोगावा लागतो. या मुद्याचा अधिक विस्तार करण्याचें मला प्रयोजन दिसत नाहीं.

मनुष्य आपल्या गरजांमधून कला निर्माण करीत असतो हें जें पत्र-लेखकानें म्हटलें आहे तें बरोबर आहे. गरज ही फक्त शोधाचीच जननी नसून कलेचीहि आहे. म्हणून ज्या कलेच्या मुळाशीं गरज नाहीं, अशा कलेविषयीं आपण सावध राहिलें पाहिजे.

त्याचप्रमाणें आपल्या इच्छेला गरजेचें रूप देऊन तिला आपण मोठे-पणा देऊं नये. मनुष्यत्व ही उमेदवारीची अवस्था आहे. या कालांत दुष्ट आणि सुष्ट शक्ती त्याला आपल्या हातांत खेळवूं पहातात. तो सदैव मोहाच्या घेऱ्यांत सांपडलेला असतो. या मोहांशीं झगडून आणि त्यांचा

प्रतिकार करून त्याला आपला मर्दपणा दाखवावयाचा असतो. जो कल्पनेनें निर्माण केलेल्या बाह्य शत्रूंशीं लढतो आणि आपल्या अंतःशत्रूविरुद्ध मात्र बोट उचलण्याचेंहि ज्याच्यांत सामर्थ्य नसतें, किंवा त्याहूनहि वाईट म्हणजे, जो या शत्रूंनाच आपले मित्र मानतो, तो खरा योद्धाच नव्हे. " युद्ध त्याला हवेंच " हें जरी खरें असलें, तरी ' याचाच अपरिहार्य उपसिद्धांत म्हणून त्यानें युद्धाला महान् कलेचें रूप दिलें आहे ' हें पत्रलेखक म्हणतो तें मात्र चूक आहे. युद्धाची कला अजून त्याला ठाऊकच नाहीं. खोट्या युद्धालाच तो खरें धरून चालला आहे! आपले पूर्वज ' यज्ञा ' विषयींची चुकीची कल्पना करून आपल्या हीन मनोविकारांचा यज्ञ करण्याऐवजीं गरीब बापड्या मनुष्येतर पशूंचा नव्हते का यज्ञ करीत? आणि आजसुद्धां पुष्कळजण तो करतात. तसेंच हें. खरी युद्धकला अजून आपल्याला शिकावयाची आहे. आज हबसाणांच्या सरहद्दीवर जें चाललें आहे त्यांत काय सौंदर्य आहे, कला आहे ? पत्रलेखकानें उदाहरणाकरितां बरीं न वाटणारीं ( त्याला ) नांवें निवडलीं आहेत. रूसो, रस्किन, थोरो आणि टॉलस्टॉय हे आपापल्या काळचे पहिल्या दर्जाचे कलावंत होते. आमच्यापैकीं पुष्कळसे जरी मेले, मातींत मिसळले, आठवणींतूनहि नष्ट झाले, तरी ते जिवंत राहातील.

पत्रलेखकानें ' निसर्ग ' या शब्दाचा अर्थ योग्य तो घेतलेला दिसत नाहीं. ' निसर्गाचें अनुकरण किंवा अभ्यास करा ' असें जेव्हां सांगितलें जातें, तेव्हां ' मोठमोठे सर्प किंवा वाघसिंह जें करतात तें करा ' असा त्याचा अर्थ नसतो. मनुष्याच्या अत्यंत उच्च अवस्थेंतील स्वभावाचा त्यानें अभ्यास करावयाचा आहे, याचाच अर्थ त्याच्या ' उन्नत स्वभावा ' चा असा मी करतों; मग तो स्वभाव कोणताहि असो. उन्नत स्वभाव म्हणजे काय, हें समजून घेण्यालासुद्धां कदाचित् बराच प्रयत्न करावा लागेल. प्राचीन आचार्यांचा आधार घेणें हें अलीकडे धोक्याचें झालें आहे. नीत्शेकडे किंवा प्रश्नोपनिषदाकडे

खोट दाखविणें अनावश्यक आहे असें माझें पत्रलेखकाला सांगणें आहे. हा प्रश्न कोणाचे उद्गार उध्दृत करून सांगण्याजोगा मला राहिलेला नाहीं. प्रस्तुत प्रश्नाविषयीं आपल्या स्वतःच्या निःस्पृह बुद्धीला काय वाटतें? केवळ उत्पत्तीपुरताच जननेंद्रियाचा उपयोग करणें हाच त्याचा योग्य उपयोग आहे, याहून दुसरा कोणताहि उपयोग करणें म्हणजे तो दुरुपयोग आहे हें म्हणणें योग्य आहे कीं अयोग्य? जर तें योग्य असेल, तर योग्य उपयोग साधण्यांत आणि दुरुपयोग टाळण्यांत उत्पन्न होणाऱ्या कोणत्याहि अडचणींनीं शास्त्रीय दृष्टीच्या शोधकानें पराभूत होऊं नये.

हरिजन : ४–४–१९३६

---

## ‘ अरण्य–रुदन ’ : : २२

“ मिसेस् सँगर या संततिनियमनाच्या पुरस्कर्त्या बाईशीं तुमचें जें संभाषण झालें, त्याचा अहवाल मीं नुकताच वाचला. तो वाचून मला इतका आनंद झाला कीं, हें पत्र लिहून मी तुमच्या भूमिकेविषयींचा मला वाटलेला आपलेपणा व्यक्त करीत आहें. तुम्हीं चांगलें धैर्य दाखविलेंत. ईश्वर तुमचें भलें करो.

“ मिसेस् सँगर या माझ्या शेजारीं राहात असत. तेव्हां हायस्कुलांतील मुलांमुलींनीं आपले स्वैरसंबंध, परिणामाची भीति न धरतां कसे चालू ठेवतां येतील या दृष्टीनें, त्यांनीं दिलेल्या माहितीचा फायदा घेतला. सँगरबाईना जर मार्ग मोकळा सोडला तर अशी एक वेळ येईल कीं, जेव्हां सार

जग इंद्रियवृत्तीच्या मागें लागेल आणि प्रेमभावना नाश पावेल. लोकांना उच्च आदर्शांचें शिक्षण देण्याला शतकानुशतकें लागतील हें मी जाणतों; पण सुरवात करण्याला आजच्यासारखी दुसरी वेळ नाहीं. सँगरबाई चुकीनें विकारी भावनेलाच प्रेम समजतात असें मला वाटतें; कारण प्रेमाचा संबंध आत्म्याशीं आहे, तें इंद्रियलालसेमधून निर्माण होत नसतें. जे आपल्या विकारांचें पोषण करतात आणि जे अगोदरच बेताल झाले आहेत, अशा लोकांना सोडून दिलें, तर कामवासनेचा संयम हा अपायकारक नाहीं या आपल्या मताशीं डॉ. अलेक्सिस कॅरेल हे सहमत आहेत. ब्रह्मचर्य हें अपायकारक आहे असें पुष्कळ डॉक्टरांचें मत आहे असें सँगरबाई म्हणतात तें चुकीचें आहे. ' अमेरिकन सोशल हायजीन असोसिएशन 'चे प्रमुख डॉक्टर आणि शास्त्रज्ञ संयम हा हितकारक आहे असेंच मानतात.

" आपण फार थोर कार्य करीत आहां. आपल्या जिविनांतील दीर्घकाळ चाललेल्या झगड्यांतील सर्व उलथापालथीकडे मी लक्षपूर्वक पहात आलों आहें. कामविषयक प्रश्नाकडे अशा उच्च आध्यात्मिक दृष्टीनें पहाणाऱ्या फार थोड्या लोकांपैकीं आपण आहांत. सप्तसागरांचें अंतर उल्लंघून माझी साथ मी आपल्याला देत आहें, हें आपल्याला कळावें असें वाटून मी हें लिहिलें आहे.

" हें सत्कार्य असेंच आपण चालू ठेवूं या. त्यायोगें तरुणांना सत्य काय आहे तें समजून येईल. कारण भविष्यकाळची आशा त्यांच्या हातीं आहे.

" माझें मुलांशीं जें भाषण होतें त्यांतील एक उतारा देत आहें :

' निर्माण करा, सतत निर्माण करा. निर्मिति करणें हें थोरपणाचें आहे, उद्धार करणारें आहे, स्फूर्ति देणारें आहे. पण ज्या क्षणीं निर्मिति

करणाऱ्या शक्ती उपभोगून तुम्ही फक्त आपल्या इंद्रियांचे कोड पुरवूं पहाल, त्या क्षणीं तुम्ही निर्मितिकार्याची फसवणूक करायला लागाल, तुमच्यामध्यें असणाऱ्या सर्व उच्च आध्यात्मिक शक्तींचा नाश करायला लागाल. त्यामुळें निराशाच पदरीं येईल

' शारीरिक, मानसिक, आणि आध्यात्मिक निर्मिति हा आनंद आहे, तें जीवन आहे. निर्मितीचा विचारहि न ठेवतां तुम्ही जर केवळ इंद्रियांच्या क्षोभाच्या मागें लागत असाल, किंवा निर्मितीचें ध्येय टाळण्याचा जरी तुम्ही प्रयत्न करीत असाल, तरी तुम्ही प्रकृतीला विकृत बनवीत आहांत आणि तमच्या आध्यात्मिक शक्तींना ठार करीत आहांत.

' याचा परिणाम म्हणजे बेफाम विकार--शीण, निराशा आणि अपयश. ज्या सुंदर, संस्कारयुक्त गुणांच्या आधारावर अध्यात्मसंपन्न अशा स्त्रीपुरुषांची नवी मानवजात आपल्याला निर्माण करतां येईल, अशा गुणांची निष्पत्ति या विकारपापणांतून कधींहि होणार नाहीं.

" एकाद्या धर्मपुरुषानें अरण्यरुदन करावें तद्वतच हें आहे हें मी जाणतों; पण त्यांतील सत्यावर माझी दृढनिष्ठा आहे आणि फक्त मार्ग दाखविण्यावांचून मी दुसरें काय करणार ? "

कृत्रिम साधनांचा निषेध करणारीं अमेरिकेहून मला जीं वारंवार पत्रें येतात त्यांतील हें एक आहे. अमेरिकेहून दर आठवड्याला हिंदुस्थानांत जें साहित्य येत आहे तें आम्हांला आग्रहपूर्वक विश्वास ठेवायला सांगतें कीं, अमेरिकेंत वेडे आणि नपुंसक यांच्याव्यतिरिक्त कोणीहि धर्मभोळ्या समजुतींच्या बंधनांतून सुटका करणाऱ्या या आधुनिक पद्धतीचा उपयोग करण्याला विरोध करीत नाहीं. ही धर्मभोळी समजूत शरीराला बंधनांत जखडून टाकते आणि अत्युच्च असा भोग भोगावयास न देऊन त्याला चिरडून टाकते.

तें साहित्य ज्या कृतींची शिकवण देतें त्या कृतीइतकीच क्षणिक धुंदी त्या साहित्यामुळें उत्पन्न होते आणि तशा कृतीचा नैसर्गिक रीत्या जो परिणाम होईल तो परिणाम होऊं न देतां ती कृति करण्याला आपल्याला उद्युक्त करतें. ‘ हरिजन ’ च्या वाचकांपुढें पश्चिमेकडून आलेलीं वैयक्तिक निषेधाचीं पत्रेंच केवळ मी मांडीत नाहीं. त्या पत्रांचा अर्थात् मला एक सत्यशोधक या नात्यानें उपयोग आहेच. पण सर्वसाधारण वाचकाला त्यांचा कांहीं उपयोग नाहीं. तथापि, तीस वर्षांचा अनुभव असलेल्या एका मुलांच्या शिक्षकांकडुन आलेल्या पत्राला एक विशिष्ट महत्त्व आहे. हिंदुस्थानांतील जी शिक्षक मंडळी आणि स्त्रीपुरुष जनता त्या प्रचंड पुरांत वाहात चालली आहेत, त्यांना तें मार्गदर्शक होईल. व्हिस्कीच्या बाटलीपेक्षां कृत्रिम साधनांचा उपयोग हा अनंतपटींनें जास्त मोह पाडणारा आहे. पण ती चकाकणारी दारू जशी तिच्या नाशकारी मोहामुळें धर्मविहित ठरत नाहीं, तसाच हा उपयोगहि धर्मविहित ठरत नाहीं. त्याचप्रमाणें त्या दोहोंचाहि वापर दिवसेंदिवस वाढतो आहे म्हणून त्यांना विरोध करणें निराशेनें सोडून द्यावें असेंहि नाहीं. विरोधकांची आपल्या कार्यावर जर श्रद्धा असेल, तर त्यांनीं तो विरोध तसाच चालू ठेवला पाहिजे. जंगलांत ठोकलेल्या आरोळीमध्यें जें सामर्थ्य आहे तें जमावामध्यें दिलेल्या आरोळीमध्यें नाहीं; कारण जंगलांतील आरोळीमागें चिंतन असतें, विचार असतो, दुर्दम्य श्रद्धा असते. जमावांतील गोंगाटाला बहुधा वैयक्तिक भोगाच्या अनुभवाचें किंवा नकोशा झालेल्या संततिविषयीं आणि गांजलेल्या मातांविषयीं जी खोटी, काल्पनिक दया वाटते तिचाच आधार असतो. वैयक्तिक अनुभवाच्या युक्तिवादाला दारूबाजाच्या युक्तिवादाइतकीच किंमत आहे. दयाभावाचा युक्तिवाद केवळ एक सांपळा आहे. त्यांत सांपडणें धोक्याचें आहे. नकोशा झालेल्या संततीच्या आणि तितक्याच तीव्रतेनें नको असलेल्या मातृपदाच्या यातना म्हणजे हितकर्त्या निसर्गानें योजिलेली शिक्षा किंवाताकीद आहे.

शिस्तीच्या आणि संयमाच्या नियमाचा अनादर करणें म्हणजे आत्मघात करणें आहे. आमची ही सत्त्वपरीक्षा आहे. शिस्तीचें जूं वाहाण्याचें जर आपण नाकारूं, तर भ्याडाप्रमाणें आपण अपयश पदरीं घेऊं आणि रणाला पाठ फिरवून जगण्याचा एकमेव आनंद टाकून देऊं !

हरिजन : २७-३-१९३७

---

## संतति-नियमनाचा प्रश्न : : २३

( स्वामी योगानंद अमेरिकेंतील आपला आध्यात्मिक प्रचाराचा दौरा संपवून नुकतेच आले होते. गांधीजींशीं त्यांना दोन प्रश्नांच्या बाबतींत चर्चा करायची होती : पापाचा प्रश्न आणि संततिनियमनाचा प्रश्न. पैकीं संतति–नियमनाच्या प्रश्नावर त्यांची गांधीजींशीं पुढीलप्रमाणें चर्चा झाली.)

स्वामींनीं विचारलें, " संततिनियमनापेक्षां आपल्याला आत्मसंयमन अधिक पसंत आहे, होय ना ? "

" कृत्रिम रीत्या संततिनियमन किंवा आज ज्या पद्धती सुचविल्या जात आहेत आणि पश्चिमेकडे प्रशंसिल्या जात आहेत तशा पद्धतींनीं संततिनियमन करणें हें आत्मघात करण्यासारखें आहे. मी ' आत्मघातकी ' म्हणतों तें मनुष्यजात नष्ट होणें या अर्थीं नव्हे, तर उच्च अर्थानें म्हणतों. म्हणजेच या पद्धती माणसाला पशूहूनहि नीच बनवितात, त्या नीतिबाह्य आहेत, असें मला म्हणायचें आहे. "

"पण अनिर्बंध प्रजोत्पत्ति आतां किती काळ आपण चालू द्यायची ? एक मनुष्य मीं पाहिला, तो एक शेर दूध विकत आणायचा आणि त्यांतच पाणी मिसळून मिसळून आपल्या मुलांना द्यायचा. कारण दर-वर्षाला त्याच्या मुलांची संख्या वाढत असायची. हें पाप आहे असें आपल्याला वाटत नाहीं काय ? "

"मुलें नकोशीं झाली असतांनाहि तीं जन्माला घालायचीं हें पाप आहे यांत शंका नाहीं. पण आपल्या कृतीचे परिणाम टाळणें हें अधिक मोठें पाप आहे असें मला वाटतें. त्याच्या योगानें माणूस केवळ नपुंसक बनतो."

"तर मग ही सत्य गोष्ट माणसाला सांगण्याची अत्यंत व्यवहार्य पद्धति कोणती ?"

"अत्यंत व्यवहार्य पद्धति म्हणजे आत्मसंयमी जीवन आचरून दाखविणें. बोलाहून कृति अधिक परिणामकारी असते."

"पण पश्चिमेकडील लोक आम्हांला विचारतात, 'तुम्ही एवढे स्वतःला अध्यात्मवादी समजणारे लोक, तुमच्यांत आमच्यांपेक्षां बाल-मृत्यूचें प्रमाण मोठें आणि आयुर्मर्यादा कमी असें कां असावें ?' महा-त्माजी, मुलें पुष्कळ असावीं असें आपण मानतां काय ?"

"मुलें मुळींच नसावींत असें माझें मत आहे."

"पण मग मनुष्यजातच नाहींशी होईल ना ?"

"नाहीं, ती नाहींशी होणार नाहीं. तिच्यांत आजच्यापेक्षां कांहीं ना कांहीं उत्कृष्ट रूपांतर घडून येईल. पण असें कधींच घडणार नाहीं. कारण अनादिकालापासून आम्हांला आमच्या वाडवडिलांकडून काम-प्रेरणेचा वारसा मिळत आला आहे. अर्थातच युगायुगांची ही संवय ताब्यांत आणायला आपल्याला प्रचंड प्रयत्न करावा लागेल, आणि तरीसुद्धां हा अगदीं सीधासाधा प्रयत्न आहे. संपूर्णपणें त्याग, संपूर्णपणें

ब्रह्मचर्य ही आदर्श अवस्था आहे. त्या आदर्श स्थितीचा विचार करणेंहि तुम्हांला झेपत नसेल तर खुशाल लग्न करा, पण तरीसुद्धां जीवन आत्मसंयमी ठेवा. "

" हें ज्ञान बहुजनसमाजाला शिकविण्याची कांहीं कामचलाऊ पद्धति तुम्हांला माहीत आहे का ? "

" मघाशींच मीं म्हटलें त्याप्रमाणें ती पद्धति म्हणजे स्वतः संपूर्ण संयम बाणवून घ्यावयाचा आणि बहुजनसमाजांत जाऊन राहायचें. सर्व चैनी सोडून देऊन संयमी जीवन घालविण्याचा जनतेवर परिणाम झाल्यावांचून राहाणारच नाहीं. मनःसंयम आणि जिव्हासंयम या दोहोंत अविभाज्य संबंध आहे. ज्याला ब्रह्मचर्य पाळावयाचें आहे तो आपल्या प्रत्येक कृतीवर ताबा ठेवील आणि सदोदित नम्र राहील. "

" आपला आशय माझ्या लक्षांत आला. बहुजनसमाजाला संयमाच्या सुखाची जाणीव नाहीं आणि आपल्याला ती त्यांना शिकवावयाची आहे. पण मीं मघांशीं पश्चिमेकडील लोकांचें जें म्हणणें सांगितलें त्याला उत्तर काय ? "

" मला वाटत नाहीं पश्चिमेकडील लोकांपेक्षां आपण जास्त आध्यात्मिक वृत्तीचे आहोंत असें. तसे आपण असतों तर इतक्या हीन दशेला पोंचलों नसतों. पण सर्वसाधारण पाश्चिमात्याचें जीवन आमच्यापेक्षां वरच्या दर्जाचें आहे, म्हणून कांहीं पाश्चिमात्य लोक आध्यात्मिक आहेत असें सिद्ध होत नाहीं. आध्यात्मिक वृत्ति ज्या कोणाची असेल त्यांचें जीवन अधिक उदात्त बनलेलें दिसलें पाहिजे, त्यांची आयुर्मर्यादा वाढलीच पाहिजे असा कांहीं त्याचा अर्थ नाहीं. "

हरिजन : ७-९-१९३५

## एक उत्साही संततिनियमन-प्रचारिका : २४

मिसेस् हाऊ–मार्टिन नांवाच्या एक इंग्रजबाई संततिनियमनाचा प्रचार करण्यासाठीं हिंदुस्थानांत आल्या होत्या. त्या गांधीजींना भेटल्या. एक गांधीजींचें मन नगी आपण पालटूं, किंवा आपल्या मनांत गांधीजींनीं पालट करावा अशा उमेदीनें आल्या होत्या. हिंदुस्थानांतील गरीब म्हणजे काय याची त्या बाईना कल्पना नव्हती. इंग्लंडमधल्या भिकार वस्तींतील दृश्यें व परिस्थितीच येथेंहि असणार अशी त्यांची कल्पना होती. त्यामुळें गांधीजींपुढें संततिनियमनाचा पुरस्कार करतांना दांडग्या पुरुषापुढें 'गरीब बापड्या स्त्री'ला कसें नमावें लागतें याचें त्या वर्णन करूं लागल्या. त्यांच्या या पहिल्याच मुद्यावर उलट बाजू घेऊन गांधीजी म्हणाले,

"'गरीब बापडी' तुम्हीं म्हटलेंत तशी स्त्री नाहीं. गरीब स्त्री ही पुरुषापेक्षांहि बलवती आहे. तुम्हा माझ्याबरोबर हिंदुस्थानच्या खेड्यांत चला, तें मी तुम्हांला दाखवून द्यायला तयार आहें. तेथें कोणीहि स्त्री तुम्हांला सांगेल कीं तिची इच्छा नसेल तर असा कोण मायेचा पूत आहे कीं जो तिला भाग पाडील? माझ्या पत्नीच्या बाबतींत मला स्वतःला जो अनुभव आहे त्यावरूनहि मी हें सांगूं शकतों,आणि माझाच एकट्याचा तसा अनुभव आहे असें नाहीं. हार जाण्यापेक्षां मरणें बेहत्तर एवढी इच्छाशक्ति असेल, तर राक्षसाचीसुद्धां स्त्रीला वांकविण्याची ताकद नाहीं. ही परस्परांच्या कबुली-नाकबुलींची गोष्ट आहे. स्त्रिया आणि पुरुष दोघांमध्येंहि पशुत्व आणि देवत्व यांचें मिश्रण आहे. आणि जर आपल्याला पशुत्वाला वांकवितां आलें, तर तें किती बरें चांगलें होईल?"

"पण जास्त मुलें होऊं नयेत म्हणून पुरुष जर दुसऱ्या बाईकडे गेला तर बायकोनें काय करावें?"

" हं, आतां तुम्ही आपली भूमिका बदलीत आहां. तुम्ही गृहीत धर-लेल्या गोष्टीच जर चुकीच्या असतील तर तुमचीं अनुमानेंहि चुकीचींच निघणार. कांहीं तरी गृहीत धरायचें आणि पुरुषाला व स्त्रीला त्यांच्या स्वभावधर्मापासून वेगळें करायचें असं करूं नका. तुमच्या पंथाच्या मुळाशीं काय आहे तें मला समजावून घेऊं द्या. तुमच्या संतति-नियम-नाच्या प्रचारानेंच मला तुमची पुरेशी ओळख झाली आहे असें जेव्हां मीं म्हटलें, तेव्हां त्या विनोदामागें थोडा गंभीरपणाहि होता; कारण संततिनियमनांतच आपली मुक्ति आहे असें मानीत असणारे कांहीं स्त्री-पुरुष मला माहीत आहेत म्हणून तुमच्या पंथाचा एकंदरींत पाया काय हें तुमच्याकडूनच मला कळूं द्या. "

" त्यांत जगाची मुक्ति आहे असें कांहीं मी म्हणत नाहीं " मिसेस् हाऊ मार्टिन म्हणाल्या, " पण कोणत्या ना कोणत्या रूपानें संततीचें नियमन केल्याशिवाय सुटका नाहीं असें मात्र मी म्हणतें. तुम्ही तें एका मार्गानें कराल, मी दुसऱ्या मार्गानें करीन. तुमच्या पद्धतीचाहि मी पुर-स्कार करतें, नाहीं असें नाहीं; पण सर्वच ठिकाणीं नाहीं. एका सुंदर क्रियेला तुम्ही आक्षेपार्ह समजतासें दिसतें. नवीन जीव उत्पन्न कर-ण्याच्या कामांत असणारे दोन प्राणी हे देवत्वाच्या अत्यंत निकट असतात. त्या कृतींत कांहीं ना कांहीं सौंदर्य आहे खास. "

गांधीजी म्हणाले, " पहा, इथें पुनः तुमच्या मनांत घोटाळा माजला आहे. नवीन जीवाची उत्पत्ति करणें ही गोष्ट देवत्वाच्या निकटची आहे हें मला मान्यच आहे. मला एवढेंच पाहिजे आहे कीं, ती क्रिया दिव्य आहे हें मनांत बाळगूनच झाली पाहिजे. याचाच अर्थ स्त्री-पुरु-षांनीं नवीन जीव निर्माण करण्याच्या उद्देशाव्यतिरिक्त दुसऱ्या कोण-त्याहि इच्छेनें एकत्र येऊं नये. पण जर ते फक्त एकमेकाला आसक्तीनें मिठ्या मारण्यासाठीं एकत्र येत असतील, तर ते सैतानाच्या निकट आहेत.

आपण देवत्वाच्या निकट आहोंत हें मनुष्य दुर्दैवानें विसरतो, आपल्यामधील पाशवी प्रेरणा तृप्त करून घेण्याच्यामागें लागतो आणि पशूहूनहि नीच बनतो. "

" पण पशूंची कां निंदा करतां ? "

" मी पशूंची निंदा नाहीं करीत. पशु आपला निसर्गधर्म पाळीत असतो. वैभवशाली सिंह हा एक थोर पशु आहे आणि मला खाऊन टाकण्याचा त्याला पूर्ण अधिकार आहे. पण त्याच्यासारखीं नखें वाढवून तुमच्यावर झडप घालण्याचें मला कांहींच कारण नाहीं. तसें मीं केलें तर मी माझा दर्जा हीन करतों आणि पशूहूनहि वाईट बनतों. "

" माझें म्हणणें मला नीट मांडतां आलें नाहीं. मी कबूल करतें कीं संततिनियमन हें बहुतेकांच्या बाबतींत मोक्षदायी नाहीं होणार, पण मनुष्याला उच्च जीवनाकडे वळविण्याचें तें एक आवश्यक साधन खास होईल. अजूनहि मला माझें म्हणणें अगदीं स्पष्टपणें मांडतां आलेंसें मला वाटत नाहीं. तरी मला काय म्हणायचें आहे तें आपल्याला कळलें ना ? "

" हरकत नाहीं. तुमचा गैरफायदा घ्यावा अशी माझी इच्छा नाहीं. पण माझें म्हणणें काय तें मी तुम्हांला समजावून देऊं इच्छितों. गैरसमजुती करून घेऊन येथून जाऊं नका. माणसानें आपल्याला वर नेणारा किंवा खालीं नेणारा या दोहोंपैकीं एक मार्ग पत्करला पाहिजे. पण त्याच्यामध्यें पशुत्व वास करीत असल्यामुळें आणि विशेषतः हा खालीं नेणारा मार्ग जेव्हां नटवून–सजवून त्याला दाखविला जातो, तेव्हां वर नेणाऱ्या मार्गापेक्षां त्याचीच निवड माणूस सहज रीत्या करतो. पापाला पुण्याचें स्वरूप देऊन पुढें ठेवल्यानें मनुष्य सहजच त्याच्या आधीन होतो, आणि मेरी स्टोप्स आणि इतर मंडळी नेमकें हेंच करीत आहेत. स्वैराचाराला धर्म बनवून लोकांना आवडेल अशा रीतीनें जर मीं त्याचा प्रचार करूं लागलों तर लोक त्याला कवटाळून धरतील, हें मला माहीत आहे. तुमच्या

सारखीं माणसें निःस्वार्थी कळकळीनें घसा फोडून जर आपला सिद्धांत मांगूं लागलीं तर आपण यशोमंदिराकडे धांव घेत आहों असेंहि कदाचित् तुम्हांला वरवर दिसेल. पण ही तुमची धांव निश्चयानें मृत्यूकडे आहे हेंहि मी जाणतों. अर्थात आपल्या हातून काय दुष्परिणाम होत आहेत याची तुम्हांला कदाचित जाणीवहि नसेल. अधोगामी प्रेरणेला प्रचाराची—पटवून देण्याची—आवश्यकता नसत. ती मुळांत मनुष्यामध्यें आहेच; आणि तिचें संयमन करून जर तिच्यावर ताबा ठेवला नाहीं, तर रोगराई आणि भयंकर सांथी उत्पन्न होण्याचें मोठें भय राहातें."

आतांपर्यंत मिसिस हाऊ मार्टिनना दैवी आणि सैतानी यांतील भेद पटलासें दिसत होतें; पण आतां त्या म्हणाल्या, "दैवी आणि सैतानी यांत वास्तविक कांहींच भेद नाहीं आणि लोक समजतात त्याहून ते अधिक एकरूप आहेत."

"तर मग तुमचें म्हणणें काय दैवी अंश आणि सैतानी अंश हे एकच आहेत? सूर्य आहे असा तुम्हांला विश्वास आहे का? जर असेल, तर सावली आहे यावर विश्वास ठेवला पाहिजे, असें तुम्हांला वाटत नाहीं काय?" गांधीजींनीं विचारलें.

"सावलीला तुम्ही 'सैतानी' कां म्हणतां?"

"तुम्ही वाटलें तर तिला 'अदैवी' म्हणा."

"सावलींत अदैवीपणा आहे असें मला नाहीं वाटत. चैतन्य सर्वत्र भरलेलें आहे."

"चैतन्यशून्यता अशी वस्तु आहेच. आपल्याला प्रियतम असणाऱ्या मनुष्याचें शरीर त्यांतील प्राण नाहींसा होतांच हिंदू लोक जाळून भस्म करतात हें तुम्हांला माहीत आहे? सर्व प्राणिमात्रांत मूलतः अभेद आहे, तरी त्यांत विविधताहि आहे; आणि या विविधतेच्या आरपार जाऊन तिच्या

मागची एकता शोधून काढायची असते–पण ती तुम्ही प्रयत्न करीत आहां तशा बुद्धीच्या मार्गानं नव्हे. जेथें सत्य आहे तेथें असत्य असलेंच पाहिजे; जेथें प्रकाश आहे तेथें छाया असलीच पाहिजे. तर्काला, बुद्धीला, त्याचप्रमाणें शरीरालासुद्धां, गौण बनविल्यावांचून व्यापकतर अशा ज्ञानाचा साक्षात्कार होणें शक्य नाहीं. ”

मिसेस् हाऊ मार्टिन गोंधळल्यासारख्या झाल्या आणि वेळ तर भरत आली होती. पण गांधीजी म्हणाले, “ कांहीं हरकत नाहीं, मी तुम्हांला जास्त वेळ द्यायला तयार आहें. पण त्यासाठीं तुम्हांला वर्ध्याला येऊन माझ्याकडे राहावें लागेल. मी तुमच्याइतकाच संतति–नियमनाचा जबरदस्त पुरस्कर्ता आहें आणि माझें मत बदलल्याशिवाय किंवा स्वतःचें बदलल्याशिवाय तुम्हीं हिंदुस्थान सोडतां कामा नये. ”

हा रोमहर्षण संवाद ऐकत असतांना मला संत फ्रान्सिसच्या महान् उद्गारांची आठवण झाली :

“ प्रकाशानें खालीं पाहिलें, त्याला अंधार दिसला. प्रकाश म्हणाला, ‘ तिकडे मी जातों. ’ शांतीनें खालीं पाहिलें, तिला युद्ध दिसलें. शांति उद्गारली, ‘ तिकडे मी जातें. ’ प्रीतीनें खालीं पाहिलें, तिला द्वेष दिसला. प्रीति म्हणाली, ‘ तिकडे मी जातें. ’ शब्दाला मूर्तरूप आलें आणि तें आम्हांमध्यें नांदूं लागलें. ”

हरिजन : १-२-१९३५

———

एका भगिनीशीं झालेल्या गंभीर चर्चेवरून संततिनियमनाच्या कृत्रिम साधनांविषयींची माझी भूमिका अजून पुरतीशी कळलेली नाहीं असें दिसतें. तीं साधनें पश्चिमेकडून आलीं आहेत म्हणून माझा त्यांना विरोध आहे असें नाहीं. पश्चिमेकडून आलेल्या कांहीं गोष्टी पश्चिमेंतील लोकांप्रमाणेंच आमच्याहि हिताच्या आहेत असें जेव्हां मला समजून येतें, तेव्हां त्यांचा मी धन्यवादपूर्वक उपयोग करीत असतों. संततिनियमनाच्या कृत्रिम साधनांना माझा विरोध आहे, तो केवळ त्यांच्या गुणावगुणांवरच आधारलेला आहे.

मी असें धरून चालतों कीं, कृत्रिम साधनांच्या पुरस्कर्त्यांपैकीं जे सुज्ञ आहेत ते या साधनांचा उपयोग ज्या स्त्रियांना आपल्या आणि आपल्या पतींच्या कामक्षुधेची तृप्ति मुलें न होतां करून घ्यावयाची आहे अशांच्या पुरताच मर्यादित करूं इच्छितात. मानवजातीमध्यें अशी इच्छा असणें हें निसर्गाला धरून नाहीं असें मी मानतों आणि त्या इच्छेची पूर्ति ही मानव-कुटुंबाच्या आध्यात्मिक विकासाला घातक आहे असें माझें मत आहे. याला विरोधी असलेल्या इतर पुराव्यांत पेनचे लॉर्ड डॉसन यांचा खालील आधार नेहमीं उद्धृत करण्यांत येतो :

"जगांत गाजणाऱ्या आणि प्रभाव गाजविणाऱ्या शक्तींपैकीं काम–प्रीति ही उपजत प्रवृत्ति इतकी मूलभूत व इतकी ओढ लावणारी आहे कीं तिचें वर्चस्व तुम्हांला मान्य करावेंच लागतें. तिला तुम्ही दाबून टाकूंच शकणार नाहीं. हितकर अशा मार्गांनीं तिला तुम्ही वळण लावू शकाल, पण बाहेर पडण्याचा कांहीं ना कांहीं मार्ग तिला पाहिजेच; आणि हा मार्ग जर अपुरता किंवा गैरवाजवीपणें बंद केलेला असेल, तर भलत्याच

मार्गाकडे ती तुम्हांला जबरदस्तीनें खेंचून नेईल. संयमालासुद्धां न तुटेल इतकी मर्यादा असते; आणि कोणत्याहि जातींत लग्न होणें ही अवघड किंवा विलंबाची बाब झाली कीं आडमार्गानें होणारे संग वाढत्या प्रमाणांत होऊं लागतात. शरीराच्या संगाबरोबरच मनाची आणि आत्म्याचीहि मिळणी झाली पाहिजे या बाबतींत सर्वजण एकमत आहेत. वारंवार झालेला शरीरसंग हा संततीचा हेतु मनांत न बाळगतां शरीरद्वारा व्यक्त झालेलें आपल्या प्रीतीचें प्रकट स्वरूपच नव्हे काय? आपण सर्वजण चुकत आहों काय?

" जननाव्यतिरिक्त कामप्रीतीचें स्वतःचें म्हणून कांहीं विशिष्ट कार्य आहे. आरोग्याचा आणि वैवाहिक सुखाचा तो एक आवश्यक भाग आहे. शरीरसंग ही जर ईश्वरी देणगी असेल, तर ती कशी वापरावी हें समजून घेणें इष्ट आहे. स्त्रीपुरुषांपैकीं एकालाच नव्हे, तर उभयतांना शारीरिक सुख लाभेल अशा रीतीनें खुद्द या संगाच्या क्षेत्राकडे विशेष लक्ष देऊन त्याचें परिशीलन झालें पाहिजे. स्त्रीपुरुषांच्या संबंधांत परस्परांनीं आनंद मिळविणें आणि परस्परांना तो देणें यामुळें त्या दोघांमध्यें एक दृढ बंधन उत्पन्न होतें आणि त्यांच्या वैवाहिक संबंध टिकविण्याला त्यामुळें मदत होते. पुष्कळशीं लग्नें फाजिल प्रीतीमुळें नव्हे, तर अपुरत्या व अडाणीपणाच्या प्रीतीमुळें अयशस्वी होतात. उत्कटता हा एक थोर ठेवा आहे. जीं कांहीं उपयोगाचीं म्हणून माणसें वाटतात त्या बहुतेकांमध्यें उत्कटता संभवते म्हणून तीं तशीं असतात. ज्या कामप्रीतीमध्यें उत्कटता नाहीं ती एक अगदींच निर्जीव वस्तु आहे. उलट, अतिसंग हा अधाशीपणासारखाच शरीरविषयक अतिरेक आहे...

" आतां मी अत्यंत महत्त्वाच्या अशा संततिनियमनाच्या प्रश्नाचा विचार करण्याकडे वळतों. संततिनियमन हें आतां राहाणारच. तें आतां सिद्ध झालें आहे. बरेंवाईट कसेंहि असो, तें स्वीकारावेंच लागेल. त्याचा

कितीहि निषेध केला तरी तें नाहींसें होणार नाहीं. आईबापांना आपल्या संततीची संख्या मर्यादित करावयाला लावणारीं कारणें कांहीं वेळां स्वार्थी असतात, पण पुष्कळ वेळां तीं सात्विक आणि प्रबळ असतात. विवाहाची इच्छा, त्याचप्रमाणें आपल्या मुलांनीं जीवनकलहाकरितां योग्य तयारी ठेवावी अशा रीतीनें त्यांना वाढविण्याची इच्छा, मर्यादित प्राप्ति, राहाणीचा खर्च, करांचें ओझें, हीं सबळ कारणें आहेत. आणखी एक गोष्ट अशी आहे कीं, शिक्षित वर्गामध्यें स्त्रियांना सार्वजनिक जीवनांत आणि आपल्या पतींच्या कार्यांत भाग घ्यावा अशी इच्छा असते. त्या इच्छेला वारंवार होणाऱ्या गर्भधारणेमुळें अडथळा येतो. संततिनियमन करावयाचें नाहीं म्हटलें म्हणजे लग्नें उशिरां करणें ओघानें येतें, आणि उशिरां लग्नें म्हटलीं कीं मग व्यभिचार आणि त्याचे सर्व घातुक परिणाम त्यांच्याबरोबर आलेच. लग्नांत विघ्नें घालावयाचीं आणि त्याचवेळीं व्यभिचाराविरुद्ध ओरड करावयाची याला कांहीं अर्थ आहे? पण पुष्कळजण म्हणतात, ‘ संततिनियमन समजा आवश्यक असलें, तरी स्वतः होऊन भोगाचा त्याग करणें हेंच एक रास्त असें संततिनियमन आहे ! अशा तऱ्हेचा भोग-त्याग एक तर परिणामकारक होणार नाहीं, किंवा जरी झाला तरी तो अव्यवहार्य होईल; आरोग्याला आणि सुखाला हानि करणारा होईल. कुटुंबांतील मंडळींची संख्या समजा चार मुलांपर्यंतच मर्यादित करावयाची म्हटली म्हणजे विवाहित दंपतींवर इतका संयम लादणें होईल कीं, त्यामुळें त्यांना दीर्घ मुदतीपर्यंत जवळजवळ ब्रह्मचर्यच पाळावें लागेल; आणि हा संयमसुद्धां लग्न झाल्यानंतर पहिल्या कांहीं वर्षांत ज्यावेळीं इच्छा फार प्रबळ असतात अशावेळीं आर्थिक कारणामुळें आतिशय कडक ठेवावा लागेल. हें लक्षांत घेतां माझें असें निश्चित मत आहे कीं, ही संयमाविषयींची अशी एक मागणी केली जात आहे कीं, जी बहुजनसमाजाच्या बाबतींत पूर्ण होणें अशक्य आहे. ती

पूर्ण व्हावी म्हणून केलेले प्रयत्न प्रकृतीला आणि सुखाला प्रतिकूल असणारा ताण लोकांवर टाकतील, आणि त्या प्रयत्नांमुळें नीतिमत्ता भयंकर धोक्यांत येईल. सृष्टिक्रमाविरुद्ध ही गोष्ट आहे. एकाद्या तहानलेल्या माणसाच्या जवळ पाणी ठेवावें आणि त्याला तें पिऊं नको म्हणून सांगावें त्यापैकींच हें आहे. संयमाच्या द्वारा संततिनियमन हें होणारच नाहीं; आणि झालें तर तें घातुक आहे.

“ तें अनैसर्गिक आणि मुळांतच अनैतिक आहे. निसर्गशक्तींना पायबंद घालून त्यांना मनुष्याच्या इच्छेप्रमाणें आणि उपयोगाप्रमाणें वळवून घेणें हें संस्कृतींत मोडतं. बाळंतपणाच्या वेळीं गुंगीचें औषध जेव्हां पहिल्या प्रथम उपयोगांत आणलें, तेव्हां त्याचा उपयोग करणें हें निसर्गाविरुद्ध आहे, दुष्टपणाचें आहे अशी ओरड झाली. कारण स्त्रीला यातना व्हाव्यात अशीच ईश्वराची इच्छा आहे ! कृत्रिम साधनांनीं संततिनियमन करणें हें मुळींच निसर्गाविरुद्ध नाहीं. संतति-नियमनाचा सदुपयोग कल्याणकारी आहे, दुरुपयोग वाईट आहे... ”

लॉर्ड डॉसन यांचा लौकिक नाकारून चालणार नाहीं. तथापि, वैद्यकीच्या बाबतींत त्यांच्या मोठेपणाचा योग्य आदर ठेवूनसुद्धां, त्यांनीं जो पुरावा म्हणून पुढें केला आहे त्याच्या महत्त्वाविषयीं, विशेषतः ब्रह्मचर्यानें राहूनसुद्धां शारीरिक किंवा नैतिक हानि न झालेल्या स्त्रीपुरुषांच्या अनुभवाविरुद्ध जेव्हां तो पुरावा पुढें केला जातो, तेव्हां मला संशय घ्यावासा वाटतो. आरोग्याचे नियम धाब्यावर बसविल्यामुळें थोडाफार आजार ज्यांनीं ओढवून घेतला आहे, असेच लोक बहुधा डॉक्टर लोकांच्या नजरेस पडतात. त्यामुळें आजाऱ्यांनीं बरें होण्याकरितां काय करावें याविषयीं पुष्कळ वेळां ते चांगला यशस्वी उपाय सांगतील; पण निरोगी स्त्रीपुरुष एकाद्या विशिष्ट दिशेनें काय करूं शकतात, हें कांहीं ते नेहमीं सांगूंच शकतील असें नाहीं. म्हणून विवाहित स्त्रीपुरुषांवर

होणाऱ्या ब्रह्मचर्याच्या परिणामाविषयीं लॉर्ड डॉसन यांनीं जो पुरावा दिला आहे, तो अतिशय सावधगिरीनेंच स्वीकारला पाहिजे. लग्न झालेल्या लोकांत कामोपभोगाच्या इच्छेनेंच उपभोग घेणें हें योग्य मानण्याची प्रवृत्ति आहे खरी. परंतु या आजच्या युगांत कांहींहि गृहीत म्हणून धरलें जात नाहीं. आणि प्रत्येक गोष्ट तावून–सुलाखून घेतली जाते; आणि तें योग्यच आहे. अशा युगांत आतांपर्यंत आम्ही लग्नानंतर आमची कामक्षुधा यथेच्छ भागवीत आलों म्हणून पुढेंहि तसेंच करीत राहणें हें शास्त्रसंमत आहे किंवा आरोग्याला पोषक आहे, असें मानून चालणें हें निःसंशय चुकीचें आहे. पुष्कळ जुन्या चालीरीती पाळायच्या आपण थांबविल्या आणि त्याचे परिणामहि चांगले दिसून आले. मग हीच एक विशिष्ट गोष्ट आपल्या परीक्षेंतून कां सुटावी ? विशेषतः जे स्त्रीपुरुष विवाहित असूनसुद्धां संयमी जीवन घालवीत आहेत, अशांना त्यापासून शारीरिक आणि नैतिक फायदा झाला असतांना त्यांच्या त्या अनुभवाच्या प्रकाशांत ही गोष्ट कां पारखली जाऊं नये ?

पण माझा संततिनियमनाच्या कृत्रिम साधनांना हिंदुस्थानांत विशिष्ट कारणांमुळें विरोध आहे. हिंदुस्थानांतील तरुणांना कामविकाराचा संयम म्हणजे काय हें माहीत नाहीं. तो त्यांचा दोष नाहीं. त्यांचीं लग्नें लवकर होतात. तशी मुळीं रूढीच आहे. विवाह झाल्यानंतर संयम राखा असें कोणी त्यांना सांगत नाहीं. आईबापांना नातवंडें पाहण्याची अनावर इच्छा असते. लग्न झालेल्या बिचाऱ्या लहान पोरींच्या आजुबाजूच्या वातावरणांत त्यांना लवकर लवकर मुलें व्हावींत अशी अपेक्षा भरलेली असते. असल्या वातावरणांत जी काय हानि व्हावयाची ती कृत्रिम साधनांच्या उपयोगानें अधिकच होणार, दुसरें काय ? आपल्या नवऱ्यांच्या इच्छेला गरीब बापड्या मुलींनीं मान तुकविलीच पाहिजे अशी जेथें अपेक्षा आहे, तेथें आतां त्यांना मुलांची इच्छा न ठेवतांसुद्धां कामोपभोगाची इच्छा करणें

हें चांगलें आहे, असें शिकविलें जाणार; आणि हा दुहेरी हेतु साधण्याकरितां त्या आतां कृत्रिम साधनांचा आधार घेणार !!

विवाहित स्त्रियांना हें अत्यंत घातुक शिक्षण आहे असें मी मानतों. स्त्रिया पुरुषांइतक्याच कामवासनेला बळी पडतात असें मला वाटत नाहीं. संयम पाळणें हें स्त्रीला पुरुषापेक्षां सोपें वाटतें. नवऱ्यालासुद्धां नाहीं कसें म्हणावें हें स्त्रीला शिकविलें पाहिजे. नवऱ्याच्या हातांतील निव्वळ एक साधन किंवा बाहुलें होऊन बसणें हें तिचें कर्तव्य मुळींच नव्हे हें तिला शिकविलें पाहिजे. हें या देशांत योग्य तऱ्हेचें शिक्षण आहे असें मी मानतों. तिला जशीं कर्तव्यें आहेत तसे अधिकारहि आहेत. सीता म्हणजे रामाच्या हाताखालचा एक खुषीचा गुलाम अशा प्रकारची ज्यांची सीतेविषयीं कल्पना आहे, त्यांना सीतेच्या स्वातंत्र्याचीहि थोरवी कळली नाहीं, किंवा रामाला प्रत्येक बाबतींत तिच्याविषयीं वाटणाऱ्या आदराची थोरवीहि समजली नाहीं. सीता ही आपलें किंवा आपल्या शीलाचें संरक्षण करण्यास असमर्थ असलेली एक असहाय अबला नव्हती. हिंदुस्थानांतील स्त्रियांना कृत्रिम साधनें वापरण्यास सुरवात करा म्हणून सांगणें, म्हणजे थोडक्यांत सांगावयाचें तर, बैलापुढं गाडी जोडण्यासारखें आहे. पहिली गोष्ट म्हणजे तिला मानसिक गुलामगिरींतून सोडविणें, तिच्या शरीराचें पावित्र्य तिच्यावर बिंबविणें, आणि राष्ट्राच्या व मानवांच्या सेवेची प्रतिष्ठा तिला दाखवून देणें, ही होय. हिंदुस्थानच्या स्त्रियांना उद्धाराची आशा नाहीं, आणि म्हणून बाळंतपणें थांबविण्याकरितां व जें कांहीं शरीरस्वास्थ्य त्यांचें असेल तें कायम ठेवण्याकरितां त्यांना कृत्रिम साधनांचा उपयोगच फक्त आतां शिकविला पाहिजे, असें मानणें योग्य नाहीं.

इच्छा असतांना किंवा नसतांनासुद्धां ज्या स्त्रियांना संततीचा भार सहन करावा लागतो, अशा स्त्रियांच्या हालांनीं उद्विग्न होणाऱ्या (आणि

त्यांचा तो उद्वेग योग्य आहे ) भगिनींनीं अधीर होऊं नये. कृत्रिम साधनांच्या बाजूनें होणाऱ्या प्रचारानें सुद्धां इष्ट परिणाम तत्काळ घडून येईल असें नाहीं. कोणतीहि पद्धत म्हटली कीं ती शिक्षणाचीच बाब आहे. योग्य पद्धत स्वीकारा एवढेंच माझें म्हणणें आहे.

हरिजन : २-५-१९३६

---

## तरुण मंडळींना : : २६

वृद्ध जें कांहीं सांगतील त्याला नांवें ठेवायचीं असा शिरस्ताच हल्लीं कांहीं ठिकाणीं पडून गेला आहे. ही समजूत अगदींच खोटी आहे असें म्हणायला मी तयार नाहीं; पण या देशांतील तरुणांना माझें स्पष्ट सांगणें आहे कीं, वृद्ध स्त्री-पुरुष आपल्याला जें कांहीं सांगतात तें वृद्धांनीं सांगितलें म्हणूनच नेहमीं तुच्छ करण्याजोगें आहे असें तरुणांनीं मानूं नये. मुलांच्या तोंडूनसुद्धां पुष्कळ वेळां जसें सुभाषित बाहेर पडतें, तसें वृद्धांच्या तोंडूनहि तें बाहेर पडतें. तें कोणाकडूनहि मिळो, बुद्धीच्या आणि अनुभवाच्या प्रकाशांत प्रत्येक गोष्ट ताडून पहाणें हाच सुवर्णनियम समजावा.

कायदेशीर रीत्या काढलेलें कर्ज फेडलेंच पाहिजे हें जसें बंधनकारक, तसें कामवासनेची पूर्ति करणें हेंहि एक पवित्र बंधन मनुष्यमात्रावर आहे, आणि ती पूर्ति न केल्यानें बुद्धि क्षीण होत जाते, असें एकसारखें आपल्या कानांवर येऊन आदळत असतें. ही कामविषयक ओढ संततीच्या

इच्छेपासून वेगळी काढली गेली आहे, आणि कृत्रिम साधनांच्या पुरस्कर्त्यांकडून असें सांगितलें जात आहे कीं, स्त्रीपुरुष दोघांनाहि जर संततीची इच्छा नसेल तर गर्भधारणा होणें ही अनिष्ट गोष्ट आहे आणि ती होऊं देतां कामा नये. हा अत्यंत घातुक सिद्धांत आहे आणि कुठेंहि त्याचा प्रचार होऊं नये असें सांगण्याचें मी धारिष्ट करतों. हिंदुस्थानांत जेथें मध्यम वर्गांतील पुरुषवर्ग जननक्रियचा दुरुपयोग करून नपुंसक बनला आहे, त्या ठिकाणीं तर तें अधिकच घातुक आहे. कामवासनेची तृप्ति हें कर्तव्यकर्म असेल, तर ज्या अनैसर्गिक दुष्ट क्रियेविषयीं ( गुद्‌—मैथुनाविषयीं ) मीं मागें एकदां लिहिलें आहे, ती आणि वासनातृप्तीच्या इतर पद्धती स्तुत्यच म्हटल्या पाहिजेत. वाचकांनीं येथें लक्षांत घ्यावें कीं, ज्याला लोक विकृत कामपूर्ति म्हणतात, अशा गोष्टीला प्रतिष्ठित व्यक्तीसुद्धां मान्यता देतात असें आढळून आलें आहे. या विधानामुळें वाचकांना कदाचित् धक्का बसेल. पण अशा गोष्टींवर कशा रीतीनें कां होईना, प्रतिष्ठितपणाचें एकदां कां शिक्कामोर्तब झालें कीं मुलांमुलींना स्वजातीयाशींच आपल्या वासनेची तृप्ति करून घेण्याचें वेड लागेल. माझ्या मतें कृत्रिम साधनांचा उपयोग हा आजपर्यंत माणसांनीं वासनापूर्तीकरितां ज्या वेड्यावांकड्या साधनांचा अवलंब केला त्याहून फारसा भिन्न नाहीं. त्यांचे परिणाम कुणाला माहीत काय झाले ते ? शाळांतील मुलांमुलींमध्यें गुप्त व्यसनानें काय अनर्थ केला आहे तो मला माहीत आहे. विज्ञानाच्या आणि प्रसिद्ध समाजनेत्यांच्या संमतीच्या नांवाखालीं कृत्रिम साधनांचा शिरकाव झाल्यानें अधिकच गुंतागुंत निर्माण झाली आहे, आणि त्यामुळें समाजाचें जीवन शुद्ध ठेवण्याकरितां कार्य करणाऱ्या सुधारकांचें काम आज तरी निदान जवळजवळ अशक्य करून सोडलें आहे. ज्या वयांत मनावर तत्काळ परिणाम होतो, अशा वयाच्या शाळां-कॉलेजांतील मुली संततिनियमनाच्या पुस्तकांचा आणि मासिकांचा अधाशीपणें अभ्यास करतात, आणि कृत्रिम

साधनांचा संग्रहहि करतात असें जर मीं वाचकांना सांगितलें, तर तो मीं गौप्यस्फोट केला असें कांहीं होणार नाहीं. विवाहित स्त्रियांपुरताच त्या साधनांचा उपयोग मर्यादित करणें अशक्य आहे. विवाहाचा उद्देश आणि त्याचा अत्यंत उच्च प्रकारचा उपयोग आपल्या पाशवी विकाराची तृप्ति करून घेणें हा आहे, त्या तृप्तीचे नैसर्गिक परिणाम काय होतील याचा विचार करण्याचें कारण नाहीं, असें म्हटलें म्हणजे विवाहाचें पावित्र्यच नष्ट होतें.

कृत्रिम साधनांची बाजू घेऊन मिशनऱ्याच्या उत्साहानें त्याचा प्रचार चालविणारे स्त्री-पुरुष, आपण त्यायोगें संततीची इच्छा नसणाऱ्या गरीब बापड्या बायकांना जुलमाच्या गर्भधारणेपासून सोडवितो, अशी खोटी कल्पना करून घेऊन या देशांतील तरुणतरुणींचें नुकसान करीत आहेत असें मी निःशंकपणें म्हणतों. संततीला मर्यादा घालण्याची ज्यांना खरी गरज आहे, त्यांच्यामध्यें यांचा प्रचार सहजगत्या होऊंहि शकत नाहीं. युरोप-अमेरिकेंतील स्त्रियांप्रमाणें आमच्या गरीब बायकांना ज्ञानहि नसतें, शिक्षणहि नसतें. आणि मध्यमवर्गांतील स्त्रियांची कड घेऊन कांहीं हा प्रचार खास चालविला जात नाहीं. कारण गरीब वर्गांतील लोकांना जितकी त्या ज्ञानाची गरज आहे, तितकी गरज निदान या वर्गांतील स्त्रियांना नसते.

पण या प्रचारानें सर्वांत मोठी हानि ही आहे कीं, त्यामुळें जुना आदर्श बाजूला सारला जाऊन त्याच्या जागीं असा एक आदर्श येत आहे कीं, तो आदर्श जर पूर्णपणें अंमलांत आणला गेला तर मानव-वंशाचें भौतिक आणि नैतिक अस्तित्वच नष्ट होईल. वीर्याच्या निष्फळ उपयोगाला प्राचीन साहित्यांत जें भयानक मानलें आहे, तीं कांहीं अज्ञाणीपणांतून निर्माण झालेली भ्रामक समजूत नव्हती. एकादा शेतकरी आपल्याजवळचें सर्वोत्कृष्ट बीं जर दगडावर पेरूं लागला तर त्या शेतकऱ्याला, किंवा एकादा शेतमालक आपल्या अत्यंत सुपीक अशा

जमिनींत चांगलें बीं—पण न उगवेल अशा स्थितींत जर पेरूं लागला, तर त्या शेतमालकाला आपण काय म्हणूं बरें ? ईश्वरानें पुरुषाला अमोघ शक्ति असणारें बीज देऊन आणि स्त्रीला पृथ्वीतलावर कुठेंहि सांपडणार नाहीं इतकें अत्यंत सुपीक क्षेत्र देऊन धन्य केलें आहे. पुरुषानें आपल्याजवळच्या अत्यंत मूल्यवान् असा हा ठेवा फुकट दवडणें हा खरोखर त्याचा मूर्खपणा, नव्हे मोठा गुन्हा आहे. आपल्यापाशीं असलेल्या बहुमोल मोत्यापेक्षांसुद्धां अधिक काळजीपूर्वक हा ठेवा त्यानें जतन करून ठेवला पाहिजे; आणि जी स्त्री आपल्या जीवोत्पादक क्षेत्रांत बीज घेतें, पण तें फुकट जावें अशा बुद्धिपुरस्सर उद्देशानें घेते, ती स्त्रीसुद्धां मूर्ख, नव्हे गुन्हेगार आहे. त्यांना दिलेल्या बुद्धीचा दुरुपयोग केल्याबद्दल ते दोघेहि अपराधी ठरविले जातील; आणि त्यांना जें लाभलें आहे तें काढून घेतलें जाईल. संगमोत्सुकता ही एक सुंदर आणि उमदी वस्तु आहे. त्याबद्दल लज्जा वाटण्याजोगें कांहीं नाहीं. पण तिचा हेतु फक्त उत्पत्ति करण्याकरितांच आहे. तद्व्यतिरिक्त तिचा उपयोग करणें हा ईश्वराचा व मानवजातीचा गुन्हा आहे. एक प्रकारची कृत्रिम साधनं पूर्वींच्या काळींहि होतीं व येथून पुढेंहि राहातील. पण त्यांचा उपयोग करणें हें पूर्वी पापरूप गणलें जात असे. आजची आमची पिढी मात्र दुष्ट प्रवृत्तीला सत्प्रवृत्ति म्हणून तिचा गौरव करीत आहे. कृत्रिम साधनांचे पुरस्कर्ते माझ्या मतें भ्रामक असा आदर्शवाद हिंदी तरुणांच्या मनांत भरवून देऊन त्यांचें मोठें नुकसान करीत आहेत. भारतमातेचें भवितव्य ज्या तरुण-तरुणींच्या हातीं आहे त्यांनीं या खोट्या देवापासून सावध राहावें आणि ईश्वरानें जो ठेवा देऊन त्यांना धन्य केलें आहे त्याचें त्यांनीं रक्षण करावें, आणि इच्छा होईल तेव्हां ज्या हेतूस्तव हा ठेवा त्यांना दिलेला आहे त्याच्याकरितांच त्यांनीं त्याचा विनियोग करावा.

हरिजन : २८–३–१९३६

---

कांहीं वर्षांपूर्वी बिहार सरकारनें आपल्या शाळांमध्यें होत असलेल्या अनैसर्गिक संभोगाच्या प्रश्नाबाबत आपल्या शिक्षणखात्यांत चौकशी केली होती. आणि चौकशीकामटाला ही पापप्रवृत्ति शिक्षकांतसुद्धां आढळून आली होती. हे शिक्षक आपली अनैसर्गिक भोगवासना तृप्त करून घेण्याकरितां मुलांमध्यें असलेल्या आपल्या स्थानाचा दुरुपयोग करीत होते. शिक्षणाधिकाऱ्यांनीं एक पत्रक काढून कोणत्याहि शिक्षकाच्या बाबतींत अशा तऱ्हेची पापप्रवृत्ति आढळून आल्यास खात्यामार्फत त्याच्यावर इलाज केला जाईल असें बजावलें होतें. या पत्रकाचा जर कांहीं परिणाम झाला असेल, तर तो काय झाला हें समजून घेणें बोधप्रद होईल.

इतर प्रांतांमधनहि यासंबंधींचें लिखाण माझ्याकडे येऊन पडलें आहे. त्यांत माझें लक्ष या दुर्गुणाकडे वेधून हिंदुस्थानांत बहुतेक सर्वत्र खाजगी, त्याचप्रमाण सरकारी शाळांतून तो वाढत्या प्रमाणांत असल्याचें दाखविण्यांत आलें आहे.

ही दुष्ट प्रवृत्ति अनैसर्गिक जरी आहे, तरी ती अनादि कालापासून चालत आली आहे. गुप्त अशा सर्व दुष्प्रवृत्तींवर इलाज शोधणें अत्यंत कठिण आहे. आणि जेव्हां या दुर्गुणानें मुलांचे पालक म्हणून असलेले शिक्षकच झपाटले जातात, तेव्हां तर हें अधिकच कठिण होऊन बसतें. 'मिठानेंच जर आपला खारटपणा सोडला, तर त्याला कशानें खारट करणार ?' माझ्या मतें खात्यामार्फत इलाज करणें हें पुराव्यानें शाबित झालेल्या बाबतींत अवश्य असलें, तरी तेवढ्यानें भागणार नाहीं. लोकमताचा नैतिक दर्जा उंचावणें हाच या दुष्ट प्रवृत्तीवर इलाज होऊं शकेल. पण परिणामकारक लोकमत असें या देशांत बव्हंशीं नाहींच. आमच्या

राजकीय जीवनाला ज्या असहाय्यतेच्या भावनेनें व्यापून टाकलेलें आहे, तिचा इतर सर्व अंगांवरहि परिणाम झाला आहे. त्यामुळें पुष्कळसे अन्याय, जे धडधडीत आपल्या डोळ्यांदेखत घडत आहेत, त्यांकडे आपलें दुर्लक्ष होत आहे.

निव्वळ वाङ्मयीन तयारीवरच सगळा जोर देणारी शिक्षणपद्धति हें पाप नाहींसें करण्याला असमर्थ आहे. इतकेंच नव्हे, तर ती पाप वाढविण्याला प्रत्यक्ष कारणीभूत झालेली दिसते. सरकारी शाळांत जाण्यापूर्वीं जीं मुलें स्वच्छ हृदयाचीं होतीं तीं शाळेचा अभ्यासक्रम संपविल्यानंतर अस्वच्छ, बायकी, आणि दुबळ्या मनाचीं झालेलीं आढळून आलीं आहेत. बिहारकमिटीनें शिफारस केली आहे कीं, ‘मुलांच्या मनावर धर्माविषयीं आदरभाव बिंबविला जावा.’ पण मांजराच्या गळ्यांत घांट बांधायची कोणी ? शिक्षक हेच धर्माविषयीं आदरभाव बिंबवूं शकतील. पण त्यांच्या स्वतःमधेंच तो नसतो. म्हणून योग्य प्रकारचे शिक्षक निवडण्याचा हा प्रश्न आहे. पण योग्य शिक्षकांची निवड याचा अर्थ हा कीं, आज त्यांना दिला जातो त्याहून बराच अधिक पगार, किंवा अध्यापनाला पोट भरण्याचा धंदा न समजतां पूर्वकाळीं तें पवित्र कर्तव्यकर्म मानलें होतें तसें मानून त्याच्यासाठीं सबंध आयुष्य वाहाणें. रोमन कॅथोलिक लोकांत आजहि तें चालू आहे. पहिली गोष्ट आपल्या देशासारख्या कंगाल देशांत उघडच अशक्य आहे. दुसरा मार्ग हाच एक खुला असलेला मार्ग मला तरी दिसतो. पण ज्या राज्यपद्धतींत प्रत्येक गोष्टीचें मूल्यमापन पैशांत केलें जातें आणि जी पद्धति जगांत अत्यंत खर्चाळ म्हणून ठरली आहे, अशा या राज्यपद्धतीखालीं आम्हांला हा मार्ग खुला नाहीं.

या पापप्रवृत्तीला आळा घालण्याच्या बाबतींतील आणखी एक अडचण म्हणजे सर्वसाधारणपणें आईबापांची आपल्या मुलांच्या

संबंधांत असलेली अनास्था ही होय मुलांना शाळेला पाठविलें कीं यांचें काम संपलें. त्यामुळें भविष्यकाळ आपल्याला निरुत्साही करणारा आहे. पण एक आशा आहे; आणि ती म्हणजे सर्व पापप्रवृत्तींवरचा एकच तोडगा जी सार्वजनिक शुद्धता ती होय. ही पापप्रवृत्ति अतिशय वाढल्यामुळें गडबडून न जातां आपण प्रत्येकानें आपल्याला करतां येईल तितकी प्रयत्नांची शिकस्त केली पाहिजे आणि त्यासाठीं मान्याचें पहिलें व निकटचें निशाण म्हणून स्वतःला मानून आपल्या स्वतःच्या लगतच्या आवर्तीभोंवतीं अत्यत बारकाईनें लक्ष पुरविलें पाहिजे. 'आम्ही इतरांप्रमाणें नाहीं' अशा कल्पनेनें आपण आपल्या मनाचें समाधान करून घेतां कामा नये. अनैसर्गिक दोष ही कांहीं एक स्वतंत्रपणें घडत असलेली गोष्ट नाहीं. एकाच रोगाचें तें एक जबरदस्त बाह्य लक्षण आहे इतकेंच. आमच्या स्वतःमध्यें जर अशुद्धता असेल, कामसंबंधांत आमची नीति जर बिघडलेली असेल, तर आपल्या शेजाऱ्याला सुधारण्यापूर्वी आम्हीं स्वतःला सुधारलें पाहिजे. दुसरे कसे आहेत याचा निवाडा करणें आणि स्वतःला मात्र मोकाट सोडणें हें फार झालें आहे. त्याचा परिणाम म्हणून दुष्ट वर्तुळ निर्माण झालें आहे. ज्यांना माझ्या या म्हणण्यातील सत्य पटतें त्यांनीं या वर्तुळांतून बाहेर पडलें पाहिजे; म्हणजे प्रगति जरी सोपी नसली, तरी बरीच शक्य कोटींत आली आहे असें त्यांना आढळून येईल.

यंग इंडिया : २७-६-१९२९

---

## एक वाढतें दुष्ट व्यसन : : २८

लाहोरच्या सनातनधर्म कॉलेजचे मुख्याध्यापक लिहितात :

" सोबत पाठविलेलीं वृत्तपत्रांतील कात्रणें, जाहिराती वगैरे आपण दृष्टिखालून घालाव्यात अशी विनंति आहे. त्यांतूनच आपल्याला काय समजावयाचें तें समजेल. इकडे पंजाबमध्यें ' दि यूथ्स् वेलफेअर ॲसोसिएशन ' ही संस्था फार उपयुक्त काम करीत आहे. विद्याखात्यांतील, त्याचप्रमाणें राज्यकारभाराच्या खात्यांतील मंडळींचें तिनें लक्ष वेधून घेतलें आहे, आणि मुलांचे जाणते पालकहि तिच्यांत सक्रिय मन घालूं लागले आहेत. बिहारचे पं. सीताराम दास हे या चळवळीचे प्राण आहेत. आणि या संस्थेच्या आश्रयदात्यांमध्यें येथील पुष्कळ चांगले प्रतिष्ठित सज्जन सामील आहेत.

" हिंदुस्थानांतील इतर प्रांतांपेक्षां पंजाब आणि सरहद्द प्रांतांत मुलांना कुमार्गगामी बनविण्याची पापप्रवृत्ति अधिक प्रमाणांत आहे हें कबूल केलें पाहिजे.

" आपण ' हरिजन 'मध्यें किंवा दुसऱ्या कोणत्याहि पत्रांत याविषयीं एखादें स्फुट किंवा एखादें पत्र लिहून या घातुक प्रवृत्तीकडे देशाचें लक्ष वेधून घेण्याची कृपा कराल का ? "

यूथ लीगच्या चिटणिसांनीं पुष्कळ दिवसांपूर्वी या अत्यंत नाजूक विषयासंबंधीं मला लिहिलें होतें. त्यांचें पत्र वाचतांच मी डॉ. गोपीचंदांशीं पत्रव्यवहार केला होता; आणि त्यांनीं लीग–चिटणिसांच्या पत्रांतील विधानांना पुष्टीच दिली होती. पण ' हरिजन 'मध्यें किंवा इतरत्र या प्रश्नाची चर्चा कशी करावी याचा मला स्पष्ट मार्ग सुचत नव्हता. मला

पापप्रवृत्तीची माहिती होती, पण वृत्तपत्रांत त्याबद्दल चर्चा केल्यानें कांहीं फायदा होईल अशी मला खात्री वाटत नव्हती. अजूनहि मला खात्री नाहीं. तथापि मुख्याध्यापकांच्या विनंतीचा अव्हेर माझ्यानें करवत नाहीं.

ही दुष्ट प्रवृत्ति कांहीं नवीन नाहीं. ती सर्वत्र पसरलेली आहे. ती कांहींहि करून गुप्त ठेवली जात असल्यामुळें तिला सहज शोधून काढणें शक्य नसतें. ढिल्या आयुष्यक्रमाच्या संगतींतच ती वाढते. मुख्याध्यापकांनीं ज्या बाबींचा उल्लेख केला आहे, त्या बाबतींत शिक्षक हेच त्यांच्या पालकत्वाखालीं असलेल्या मुलांना बिघडविण्याला कारणीभूत झालेले आहेत म्हणतात. ‘ मिठानेंच खारटपणा सोडला तर त्याला कशानें खारट करणार ?’

एकादें कमिशन नेमून किंवा कोणत्याहि सरकारकडून यशस्वीपणें उपाय होण्याजोगी ही बाब नाहीं. नीति-सुधारकांचें हें काम आहे. आई-बापांना त्यांच्या जबाबदारीची जाणीव करून दिली पाहिजे. विद्यार्थ्यांना शुद्ध जीवनाच्या निकट सान्निध्यांत ठेवलें पाहिजे. नीतिधर्म आणि शुद्ध राहणी हाच खऱ्या शिक्षणाचा पाया आहे, या कल्पनेचा कळकळीनें प्रचार झाला पाहिजे. शैक्षणिक संस्थांच्या विश्वस्तांनीं शिक्षकांची निवड अत्यंत कसोशीनें केली पाहिजे; आणि निवड केल्यानंतरसुद्धां ते तितक्या योग्य रीतीनें राहातात कीं नाहीं इकडे लक्ष पुरविलें पाहिजे. हें भयानक पाप जरी पूर्णपणें काढून टाकतां आलें नाहीं, तरी त्याला अंकुशांत ठवण्याचे हे कांहीं मार्ग सुचविले आहेत.

हरिजन : २७-४-१९३५

लाहोरच्या सनातनधर्म कॉलेजच्या मुख्याध्यापकांचें पुढील पत्र मी आनंदानें प्रसिद्ध करीत आहें:

" लहान मुलांवर केल्या जाणाऱ्या अनैसर्गिक दुष्कर्माच्या बाबीशीं संबद्ध असलेल्या अत्याचाराच्या भयानकतेकडे अत्यंत कळकळीनें मी आपलें लक्ष वेधूं इच्छितों.

" आपल्याला माहीतच आहे कीं, असे गुन्हे पोलिसांकडे किंवा कोर्टापुढें फारच कमी गुदरले जातात. हल्लीं पंजाबांत तर असल्या गोष्टींना परवाना मिळाल्यासारखाच झाला आहेसें दिसतें. सोबत पाठविलेल्या वृत्तपत्रांच्या कात्रणांत कोर्टापुढें फारच क्वचित् येणाऱ्या खटल्यांपैकीं फक्त अत्यंत ढळढळीत खटल्यांची हकिकत तेवढी दिली आहे. त्यांवरून आमच्या मुलांमुलींना जो धोका उत्पन्न झाला आहे त्याच्या भयंकरपणाची पूर्ण कल्पना आपल्याला येईल. कांहीं महिन्यांपूर्वी लाहोरमध्यें शाळेंत जाणाऱ्या लहान लहान मुलांना भरदिवसां कांहीं शाळांच्या अगदीं दरवाजांतूनच पळवून नेण्याचे धाडसी प्रयत्न गुंडांनीं केले. आजसुद्धां मुलें शाळेंत जात-येत असतांना त्यांच्यावर विशेष नजर ठेवण्याची व्यवस्था करणें आवश्यक आहे. कोर्टापुढें चाललेल्या खटल्यांच्या हाकिकतींत ज्या अत्याचारांचें वर्णन आहे, त्यांतील क्रूरता आणि निधडेपणा अत्यंत अघटित आणि सैतानी आहे.

" या बाबीसंबंधीं लोकांची भावना सामान्यपणें एक तर उदासीनतेची किंवा असहाय्यतेची आहे. आणि हे गुन्हे नाहींसे करण्याला लागणाऱ्या

संघटित प्रयत्नांच्या बाबतींत त्यांना आत्मविश्वास वाटत नाहीं.

"सोबत पंजाब-सरकारनें काढलेल्या एका परिपत्राची नक्कल जोडली आहे. त्यावरून लोकांप्रमाणेंच त्या खात्यांतील आपल्या अधिकारी वर्गाची उदासीन वृत्ति पाहून सरकारची वृत्तिसुद्धां कशी असहाय्य बनली आहे तें आपल्याला दिसून येईल.

"या प्रकारच्या लैंगिक गुन्ह्यांच्या विषयासंबंधीं सार्वजनिक चर्चा होण्याला ही वेळ आतां योग्य आहे, आणि सर्व देशभर लोकमताचा दर्जा उंचावणें हाच एक त्या दुष्ट प्रवृत्तीवर इलाज आहे, असें आपण ता. ९ सप्टेंबर १९२६ च्या आणि २७ जून १९२९ च्या 'यंग इंडियां'तील संपादकीय लेखांत जें लिहिलें आहे, तें बरोबर आहे. अशा तऱ्हेनें लोकमताचा दर्जा उंचावण्याला वृत्तपत्रांतून त्याचा गवगवा करणें हाच एक परिणामकारक मार्ग आहे.

"आजच्या भयानक परिस्थितीला तोंड देण्याकरितां कमींत कमी एवढें तरी केलेंच पाहिजे, असें मला अत्यंत नम्रतापूर्वक सुचवावयाचें आहे आणि म्हणून या भयंकर गोष्टींविरुद्ध जोराची मोहीम करण्यासाठीं वृत्तपत्रांना संघटित करण्याकरितां आपली प्रभावी हांक देऊन आपण त्यांना मार्गदर्शन करावें अशी माझी आपल्याला कळकळीची विनंति आहे."

या दुष्ट प्रवृत्तींविरुद्ध अखंड लढाई सुरू ठेवली पाहिजे यांत कांहीं शंका नाहीं. सदर पत्रासोबत जोडलेल्या किळसवाण्या हकिकती मीं संपूर्ण वाचल्या. मुख्याध्यापकांनीं ज्या लेखांचा उल्लेख केला आहे, त्या लेखांत चर्चिलेल्या हकिकतीहून वेगळ्याच नमुन्याच्या या हकिकती आहेत. शिक्षकांनीं मुलांना बिघडविल्याचाच केवळ त्यांमध्यें उल्लेख होता. आज माझ्याकडे पाठविल्या गेलेल्या हकिकतींत बव्हंशीं अशाच गोष्टी आहेत, कीं ज्यांत गुंडांनीं कोंवळ्या वयाच्या मुलांवर अनैसर्गिक

अत्याचार करून नंतर त्यांना मारून टाकल्याचें लिहिलें आहे. अनैसर्गिक अत्याचार केल्यानंतर मारून टाकल्याचीं हीं उदाहरणें जरी अधिक हिडिस वाटत असलीं तरी, मुलांनीं आपखुशीनें आपल्या शिक्षकांचें भोगस्थान बनावें अशा उदाहरणांपेक्षां इलाज योजण्याच्या दृष्टीनें हीं अधिक सहजसाध्य आहेत असें मला वाटतें. दोन्ही बाबतींत सुधारकानें सतत जागरूकता ठेवण्याची आणि हीं किळसवाणीं दुष्कृत्यें होऊं नयेत म्हणून लोकांची विवेकबुद्धि जागृत करण्याची आवश्यकता आहे.

पंजाबमध्यें हा गुन्हा वाढीस लागलेला दिसतो. अर्थात् त्या प्रांताच्या पुढाऱ्यांनीं धर्म, जात इत्यादींचा विचार बाजूस सारून एकत्र येऊन पंच नद्यांच्या पवित्र प्रदेशांतील तरुणाला दुष्ट गुंडांपासून—मग ते मनें भ्रष्टविणारे असोत, वा बलात्कार केल्यानंतर मारून टाकणारे असोत—वांचविण्याचे उपाय योजणें हें त्यांचे कर्तव्य आहे. असे गुन्हे करणाऱ्यांचा धिक्कार करणारे नुसते ठराव पसार करण्याचा कांहीं उपयोग नाहीं. सर्व गुन्हे म्हणजे निरनिराळया प्रकारचे रोग आहेत; आणि सुधारकांनीं रोग म्हणून त्यांवर उपचार केले पाहिजेत. याचा अर्थ असा नव्हे कीं पोलिसांनीं त्याकडे सार्वजनिक गुन्हा म्हणून पाहूं नये. पण पोलिसांच्या उपायांचा हेतु अशा सामाजिक उपद्रवांचीं मळ कारणें उखडून काढण्याचा कधींहि नसतो. तो सुधारकांचाच अधिकार आहे. आणि समाजाची नीतिविषयक जाणीव जर उच्च पातळींत गेली नाहीं, तर वृत्तपत्रांतून तुम्ही कांहींहि लिहा, असे गुन्हे वाढतच राहतील. याचें कारण इतकेंच कीं, या विकृत वृत्तीच्या लोकांची नीतिविषयक जाणीव बोथट झालेली असते, आणि वृत्तपत्रें—विशेषतः अशा दुष्ट वृत्ताच्या बाबतींत ज्यामध्यें तळमळीचा उपदेश असतो असे भाग—ते लोक क्वचितच वाचतात. म्हणून मला जो एकमेव उपाय सुचतो तें

असा कीं, सनातनधर्म कॉलेजच्या मुख्याध्यापकांसारखे जे कोणी उत्साही सुधारक असतील, त्यांनीं इतर समाजसुधारकांना एके ठिकाणीं जमवावें आणि या पापप्रवृत्तीचें निर्मूलन करण्याकरितां संघटित उपाययोजना करावी.

हरिजन : १९-१०-१९३५

---

## कृत्रिम संतति-नियमन म्हणजे— : : ३०

डॉ. सोखे आणि डॉ. मंगळदास मेहता यांच्यामध्यें संततिनियमनाच्या नित्यनूतन अशा विषयावर जो नुकताच वाद्विवाद झाला, त्यामुळें मरहूम डॉ. अन्सारी यांचें याविषयींचें डॉ. मंगळदासांनाच पाठिंबा देणारें मत प्रसिद्ध करण्याचें मला धारिष्ट होत आहे. जवळजवळ एक वर्षापूर्वीं मीं डॉ. अन्सारींना पत्र लिहून विचारलें होतें कीं, या भानगडीच्या प्रश्नासंबंधीं मीं जी भूमिका घेतली आहे, तिला तुम्ही एक वैद्यकशास्त्रज्ञ या नात्यानें पाठिंबा देऊं शकतां कां ? त्यांनीं आपला हार्दिक पाठिंबा आहे असं लिहून मला सानंद चकित केलें. गेल्या खेपेस मी दिल्लीस गेलों होतों त्यावेळीं माझी त्यांच्याशीं या विषयावर थोडक्यांत चर्चा झाली होती. आणि माझ्या विनंतीवरून त्यांनीं एक लेखमाला लिहिण्याचें आश्वासन दिलें होतें. या लेखमालेंत स्वतःच्या आणि इतर वैद्यशास्त्रज्ञांच्या अनुभवांतून माहिती आणि आंकडे देऊन संततिनियमनाकरितां कृत्रिम

साधनें वापरण्याचा ज्यांनीं सराव ठेवला, अशा स्त्रीपुरुषांची कशी हानि झाली हें ते दाखविणार होते. आपली पत्नी किंवा इतर स्त्रिया कृत्रिम साधनें वापरीत आहेत हें जाणून तिच्याशीं किंवा त्यांच्याशीं कांहीं काळ संग केल्यानंतर कोणत्या अवस्थेप्रत हे पुरुष गेले याचें त्यांनीं हुबेहूब वर्णन केलें. संभोगाच्या नैसर्गिक परिणामाच्या भीतीपासून मुक्त झाल्यामुळें ते बेफाटपणें स्वैराचार करूं लागले! याचा परिणाम असा झाला कीं, बायकांना पहाण्याची बेसुमार वखवख त्यांना सुटली आणि शेवटीं त्यांत त्यांचा बुद्धिनाश झाला. डॉक्टरांनीं आश्वासन दिलें होतें, पण ही लेखमाला सुरू होण्याच्या वेळींच त्यांचा अंत झाला ही केवढी दुःखाची गोष्ट !

कृत्रिम साधनांच्या साहाय्यानें संभोग करणें हें अनैसर्गिक मैथुन करण्याइतकेंच वाईट आहे असें बर्नार्ड शॉ म्हणाल्याचें समजतें. एक क्षणभर जरी विचार केला, तरी हें वर्णन किती तंतोतंत बरोबर आहे तें समजून येईल.

मला विद्यार्थ्यांकडून बहुधा रोज आणि शिक्षकांकडूनसुद्धां केव्हां केव्हां दयाजनक पत्रें येतात. त्यांत आपण या सवयीचे कसे गुलाम झालो आहोंत आणि हळुहळू आपल्या पुरुषत्वाचा कसा ऱ्हास होत आहे याचें गाऱ्हाणें गायिलेलें असतें. याच्याच बरोबर, लाहोरच्या सनातन धर्म कॉलेजच्या मुख्याध्यापकांचें पत्र, जें पूर्वीं प्रसिद्ध केलें आहे, तें लक्षांत आणावें; त्या पत्रांत त्यांनीं शिक्षक हे आपल्या विद्यार्थ्यांशीं अनैसर्गिक संभोग कसा करतात व त्याचा त्यांच्या शरीरावर आणि शीलावर काय परिणाम होतो याविषयीं अत्यंत तीव्र शब्दांत तक्रार केली आहे. या उदाहरणांवरून मी अनुमान काढतों तें हें कीं, नवरा-बायकोच्या संगापासून नैसर्गिक रीत्या जो परिणाम घडण्याचा संभव आहे तो संभव जर टाळला, तर मुष्टिमैथुन किंवा अनैसर्गिक संभोग यांमध्यें जो सर्वनाश हटकून ठेवलेलाच असता, तसाच सर्वनाश अशा संगामुळेंसुद्धां ओढवलाच पाहिजे.

संततिनियमनाच्या पुष्कळशा पुरस्कर्त्यांचा कृत्रिम साधनांचा उपयोग करण्याच्या बाबतींत झपाट्यानं प्रचार चालू आहे, त्याला त्यांच्या अंतःकरणांतील दयाभावच कारण आहे यांत शंका नाहीं. त्यांच्या या अनाठायीं असलेल्या दयाभावाचे घातुक परिणाम त्यांनीं लक्षांत घ्यावे असें मी त्यांना सांगूं इच्छितों. ज्या लोकांपर्यन्त त्यांना इच्छा आहे त्यांतील कोणीहि फारसे या साधनांचा उपयोग करणार नाहींत. ज्यांनीं त्यांचा उपयोग करतां कामा नये, ते हटकून त्यांचा उपयोग करतील आणि त्यामुळें स्वतःचा आणि आपल्या जोडीदारिणीचा नाश करून घेतील. कृत्रिम साधनांचा उपयोग शरीरस्वास्थ्याच्या आणि नीतीच्या दृष्टीनें निर्विवाद रीत्या जर योग्य ठरला असता, तर मग कांहीं हरकत नव्हती. डॉ. अन्सारी यांच्या मतासंबंधीं माझा पुरावा ग्राह्य मानला, तर वर्तमान आणि भावी सुधारकांना ती एक गंभीर ताकीदच आहे.

हरिजन : १२-९-१९३६

---

## विद्यार्थ्यांना कालिमा : : ३१

पंजाबांतील एका कॉलेज-कुमारिकेकडून आलेलें अतिशय करुणाजनक पत्र जवळजवळ दोन महिने माझ्या फायलींत पडून आहे. त्या मुलीच्या प्रश्नाचें उत्तर चुकविण्याकरितां वेळेचा अभाव हें एक फक्त निमित्त होतें. उत्तर मला माहीत होतें, तरी तें देण्याची मी कांहीं तरी करून टाळाटाळ करीत होतों. एवढ्यांत एका अत्यंत अनुभवी भगिनीकडून दुसरें एक पत्र आलें. आणि मग मला वाटलें कीं त्या कॉलेज-कुमारिकेपुढें जी खरोखरच अडचण उत्पन्न झाली आहे, ती निवारण

करण्याचें कर्तव्य मला आतां चुकवितां येणार नाहीं. त्या मुलीनें शुद्ध हिंदुस्थानींत पत्र लिहिलें आहे. त्या पत्रावरून तिच्या हृदयांतील तीव्र भावनांचें पुरेपुर चित्र माझ्यापुढें उभें राहिलें. त्या पत्राचा शक्य तो परामर्श मला घेतला पाहिजे. त्यांतील कांहीं भाग खालीलप्रमाणें आहे :

" तरुण मुलींना आणि प्रौढ स्त्रियांना कांहीं प्रसंग असे येतात कीं, जेव्हां स्वतःची इच्छा नसतांनासुद्धां त्यांना एकटेंच बाहेर पडण्याचें साहस पत्करावें लागतें. मग त्यांना एका जागेहून दुसऱ्या जागीं जायचें असो, किंवा एका गांवाहून दुसऱ्या गांवीं जायचें असो. आणि त्या अशा एकट्या आढळून आल्या, कीं पापी विचाराचे लोक त्यांना सतावून सोडतात. त्या रस्त्यानें जवळून जात असल्या कीं ते अभद्रच नव्हे, तर अगदीं अचकट विचकट भाषा वापरतात आणि त्यांना भीति वाटण्याजोगें कांहीं नसलें म्हणजे तर याहूनहि पुढें जायला ते कचरत नाहींत. अशा प्रसंगीं अहिंसा कोणत्या तऱ्हेनें उपयोगी पडेल हें मला पाहिजे आहे. हिंसेचा उपयोग तर ठवलेलाच आहे. त्या मुलीच्या किंवा बाईच्या अंगीं जर पुरेसें धैर्य असेल, तर जें कांहीं हातीं लागेल त्याचा ती उपयोग करील आणि दुष्टांना धडा देईल. निदान आरडाओरडा करून आजुबाजूच्या लोकांचें लक्ष तरी वेधून ती घेऊं शकेल आणि दुष्टांची चांगली चामडी लोळेल. पण अशा वागणुकीचा परिणाम ही व्याधि दूर ढकलण्यापुरताच होईल, ती त्यामुळें निर्मूळ होणार नाहीं, हें मी जाणतें. जिथें अशा वाह्यात लोकांची आपली ओळख आहे तिथं आपण त्यांची समजूत घालूं लागलों तर ती त्यांना पटेल, आपल्या प्रेमाचा आणि नम्रतेचा त्यांच्यावर परिणाम होईल. पण समजा, एकादा मनुष्य सायकलीवरून चालला आहे आणि एकाद्या मुलीला किंवा बाईला बरोबर कोणी पुरुष माणूस नाहीं असें पाहून अश्लील शब्द तो काढूं लागला, तर त्याला काय करावें ?

त्याला समजुतीच्या चार गोष्टी सांगण्याची संधीच आपल्याला मिळत नाहीं. त्याला पुनः आपण कधीं भेटूं असाहि संभव नसतो. आपण त्याला ओळखण्याचाहि संभव नसतो. आपल्याला त्याचा पत्ता माहीत नसतो. अशा परिस्थितींत एकाद्या गरीब बापड्या मुलीनें किंवा बाईनें काय करावें ?

" उदाहरण म्हणून मी माझा स्वतःचाच कालच्या रात्रीचा अनुभव सांगतें. संध्याकाळीं साधारणतः ७–३० वाजतां मी कांहीं एका विशेष कामाकरितां बरोबर एक दुसरी मुलगी घेऊन बाहेर पडले होतें. त्यावेळीं सोबतीला कुणी पुरुष माणूस घेणें अशक्य होतें आणि काम पुढें ढकलतां येत नव्हतें. वाटेनें जात असतांना एक शीख तरुण सायकल-वरून आमच्याजवळून गेला. आणि जातां जातां आम्हांला ऐकूं येईल एवढ्या अंतरापर्यंत त्यानें तोंडांतल्या तोंडांत कांहीं तरी बडबडायला सुरवात केली. आम्हांला कळलें कीं हें आम्हांलाच उद्देशून आहे. आमच्या मनाला धक्का बसला अन् आम्हांला कसेंसेंच झालें. रस्त्यावर कुणी माणसें नव्हतीं. आणखी थोडीं पावलें आम्ही चालून जातों न जातों तोंच तो सायकलवाला परतला. तो कांहीं अंतरावर असतांनाच आम्हीं त्याला ओळखलें. त्यानें सायकल आमच्याकडे वळविली; उतरायचें त्याच्या मनांत होतें कीं आमच्याजवळूनच फक्त त्याला जायचें होतें, देव जाणे. आम्हांला वाटलें कीं धोका आला. शारीरिक बळ आमच्या अंगांत आहे असा आम्हांला विश्वास वाटत नव्हता. सर्वसाधारण मुलींपेक्षांसुद्धां मी थोडी जास्त अशक्त आहें. पण माझ्या हातांत त्यावेळीं एक भलें मोठें पुस्तक होतें. एकदम कुठून कुणास ठाऊक, माझ्या अंगांत धैर्य आलें. मीं तें लठ्ठ पुस्तक सायकलकडे जोरानें फेकलें अन् ओरडलें, ‘ पुन्हः असा फाजिलपणा करशील ? ’ त्यानें आपला तोल कसाबसा सांवरला, पाय मारले आणि सायकल हाणली. जर तें पुस्तक मीं फेकलें

नसतें, तर आम्ही इष्टस्थळीं पोंचेपर्यंत घाणेरडें बोलून बोलून त्यानें आम्हांला सतावलें असतें.

"ही घटना अगदीं सामान्य, कदाचित् क्षुल्लकहि असेल; पण आपण एकदां लाहोरला या आणि आम्हां दुर्दैवी मुलींच्या अडचणी ऐकून घ्या. आपल्याला खात्रीनें यावर तोडगा सांपडेल. पहिल्यानें मीं वर वर्णन केलं तशा परिस्थितींत मुलींनीं अहिंसेचं तत्त्व अमलांत आणून स्वतःचा कसा बचाव करावा हें सांगा. दुसरी गोष्ट म्हणजे, तरुणांना स्त्रियांचा अवमान करण्याची जी गलिच्छ खोड लागली आहे त्यापासून त्यांना सुधारण्याचा उपाय काय? आपण असं तर म्हणणार नाहीं ना, कीं अगदीं लहानपणापासून स्त्रियांशीं दाक्षिण्यानें वागण्याचें शिक्षण दिलेली नवी पिढी अस्तित्वांत येईपर्यंत आम्हीं स्त्रियांनीं थोडी वाट पहावी आणि कळ सोसावी? या सामाजिक दुष्कृत्याचा समाचार घेण्याला सरकार एक तर नाखुष आहे किंवा असमर्थ आहे. बड्या पुढाऱ्यांना असल्या गोष्टीकडे लक्ष द्यायला सवड नाहीं. एखाद्या मुलीनें गैरवागणूक करणाऱ्या एखाद्या तरुणाची धैर्यानें खरडपट्टी काढली असें जर त्यांच्या कानांवर आलें तर ते 'वा छान, अस्सं सगळ्या मुलींनीं केलं पाहिजे' असें मात्र म्हणतील. केव्हां केव्हां विद्यार्थ्यांच्या अशा बेशिस्त वागणुकीवर एखादा पुढारी सुरेखसें व्याख्यान देतांनाहि दिसेल. पण कोणाही या अत्यंत गंभीर प्रश्नाकडे आपलें तनमन खर्चून लक्ष लावीत नाहीं. दिवाळीच्या अन् अशाच दुसऱ्या सुटीच्या दिवसांत वर्तमानपत्रें स्त्रियांना ताकीद देतात कीं त्यांनीं दीपोत्सव पहायलासुद्धां बाहेर पडूं नये! हें ऐकून तुम्हांला काय वाटेल? या एकाच गोष्टीनें जगाच्या या कोपऱ्यांत आमची काय दशा झाली आहे हें तुम्हांला बरोबर कळून येईल. लेखकांना आणि वाचकांना दोघांनाहि अशा सूचना काढाव्या लागल्याबद्दल यत्किंचितहि शरम वाटत नाहीं."

दुसऱ्या एका पंजाबी कुमारिकेला हें पत्र मीं वाचावयाला दिलें आणि तिनेंहि आपल्याला आपण कॉलेजमध्यें असतांना असाच अनुभव आला आणि पत्रलेखिकनें जी हकीकत लिहिली आहे, तसा तर बहुतेक मुलींचा अनुभव आहे, असें मला सांगितलें.

दुसरें एक पत्र एका अनुभवी बाईकडून आलें आहे. त्यांत तिनें लखनौ येथील आपल्या मैत्रिणींचे अनुभव दिले आहेत. सिनेमागृहांत मागच्या रांगेंत बसलेले तरुण वाटेल तसले शब्द—ज्यांना मी काय म्हणूं ? फक्त असभ्य म्हणतों झालं !—वापरून मुलींना त्रास देतात. प्रत्यक्ष चेष्टाहि म्हणे ते अंमलांत आणतात. त्या चेष्टांचें वर्णन पत्रलेखिकेनें केलें आहे, पण तें मी येथें देऊं इच्छित नाहीं.

या बाबतींत वैयक्तिक दृष्टीनें ताबडतोब सुटका करून घ्यायची असेल, तर स्वतःला शरीरानें अशक्य म्हणविणाऱ्या मुलीनें जो उपाय अंमलांत आणला, म्हणजे सायकलवाल्याच्या अंगावर पुस्तक फेकलें, तो अगदीं बरोबर होता. तो पूर्वीपासून चालत आलेला उपाय आहे. आणि मीं पूर्वीं लिहिलें आहे कीं, एखाद्याला शरीरबळाचा उपयोग करायचा असेल, तर त्याचा प्रतिस्पर्धी किती जरी शक्तिवान् असला, तरी परिणामकारक उपयोग होण्याच्या मार्गांत त्याची शारीरिक दुर्बलता आडवी येत नसते. आणि आजच्या काळांत शरीरबळ वापरण्याच्या इतक्या कांहीं पद्धती निघाल्या आहेत कीं, एखादी लहान पोरसुद्धां थोडी बुद्धि वापरून अगदीं महान् अनर्थ घडवून आणं शकते, हें आपल्याला माहीत आहे. पत्रलेखिकेनें वर्णन केलें तसल्या प्रसंगीं मुलींना स्वतःचें रक्षण करण्याचें शिक्षण देण्याची प्रथा अलिकडे वाढत आहे. पण आपल्या हातीं असलेल्या त्या पुस्तकाचा बचावाकरितां हत्यारासारखा तात्पुरता उपयोग आपण जरी केला, तरी वाढत्या पापप्रवृत्तीवर तो कांहीं उपाय नव्हे, हें समजण्याइतकी ही पत्रलेखिका सुज्ञ आहे. असभ्य उद्गारांनीं

मन अस्वस्थ होऊं देऊं नये, तरी त्यांची उपेक्षाहि करूं नये. अशा सर्व हाकिकती वृत्तपत्रांत प्रसिद्ध कराव्या. दोषी माणसांचीं नांवें कळलीं, तर तींहि प्रसिद्ध करावींत. असें दुष्कृत्य बाहेर पाडण्याच्या बाबतींत खोटी लाज उपयोगाची नाहीं.

सार्वजनिक बाबतींत होणाऱ्या गैरवर्तणुकीची सार्वजनिक रीत्या निर्भर्त्सना होण्याइतका दुसरा चांगला उपाय नाहीं. पत्रलेखिका म्हणते त्याप्रमाणें अशा बाबतींत लोकांच्यामध्यें फार उदासीन वृत्ति आहे हें खरें आहे. पण फक्त लोकांनाच दोष देतां उपयोगी नाहीं. असभ्य वर्तुणुकीचीं उदाहरणें त्यांच्यापुढें ठेविलीं पाहिजेत. ज्याप्रमाणें चोऱ्या झाल्या तर त्या प्रसिद्ध केल्या पाहिजेत, त्यांचा पाठपुरावा केला पाहिजे; तसें केलें नाहीं तर चोरटेपणावर उपाययोजना करतां येणार नाहीं, त्याचप्रमाणें असभ्य वर्तुणुकींचीं उदाहरणें जर तशींच दाबून ठेवलीं, तर त्यांवर उपाययोजना करणें अशक्य आहे. गुन्ह्याला आणि दुराचाराला आपली शिकार धुंडाळण्यासाठीं अंधार लागतो. त्यांच्यावर प्रकाश खळूं लागला कीं ते नाहींसे होतात.

पण मला अशी भीतियुक्त शंका वाटते कीं, आजच्या तरुणीला चारसहा रोमिओंची ज्युलिएट होणें* आवडतें. तिला साहस प्रिय आहे. मला पत्र लिहिणारी ही मुलगी सर्वसाधारण मुलींपैकीं दिसत नाहीं. आधुनिक तरुणी थंडी, ऊन, वारा, यांच्यापासून रक्षण व्हावें म्हणून पोषाख करीत नाहीं, लोकांचें लक्ष आपल्याकडे वेधून घेण्याच्या दृष्टीनें करते. आपला चेहरा रंगवून आणि असामान्य बनून ती निसर्गाची उणीव भरून काढते. अशा मुलींच्याकरितां अहिंसक मार्ग नाहीं. मीं पुष्कळ वेळां लिहिलें आहे, कीं आमच्यामधील अहिंसकवृत्तीची वाढ

---

* शेक्सपिअरच्या एका नाटकांतील पात्रें : रोमिओ = प्रियकर, ज्युलिएट = प्रेयसी.

कांहीं विशिष्ट नियमांनीं होत असते. तो एक प्रचंड प्रयत्न आहे. विचाराच्या आणि आचाराच्या पद्धतींत तो क्रांति घडवून आणतो. पत्र लिहिणारी मुलगी आणि तिच्याच विचारसरणीच्या इतर मुली जर नेमून दिलेल्या रीतीनें आपल्या जीवनांत क्रांति करतील, तर त्यांना लवकरच आढळून येईल, कीं जर कोणी तरुण त्यांच्या संसर्गांत आलेच तर ते त्यांच्याकडे आदरानें पहायला आणि त्यांच्या हजेरींत अत्यंत उत्कृष्ट वर्तणूक ठेवायला शिकतील. पण जर यदाकदाचित् त्यांना आपल्या पावित्र्यावरच घाला येणार असा धोका दिसूं लागला, आणि तसा तो दिसण्याचा संभव आहे, तर 'पुरुषाच्या पशुत्वापुढें मान वांकविण्यापेक्षां मेलें तरी बेहेत्तर' असें धैर्य त्यांनीं अंगीं बाणवून घेतलें पाहिजे. धडपड करण्याचीसुद्धा शक्ति नाहींशी करण्याकरितां एखाद्या मुलीचें तोंड दाबून टाकलें आणि हातपाय बांधून टाकले, तरी मला वाटतें, तितक्या सहजपणें तिला मरण येणार नाहीं. पण मी खात्री-पूर्वक सांगतों कीं, प्रतिकार करण्याची जबरदस्त इच्छा असणाऱ्या मुलीला दुबळी करून टाकण्यासाठीं उपयोगांत आणलेले सर्व बंध तटातट तोडून टाकतां येतील. तिची निग्रही इच्छाशक्तीच तिला मरण्याचें बळ देते.

पण ज्यांनीं स्वतःला त्या दृष्टीनें शिक्षित केलें आहे, अशांनाच हें शौर्य शक्य आहे. ज्यांची अहिंसेवर जिवंत श्रद्धा नाहीं त्या स्त्रिया बचावाची नित्याची कला शिकतील आणि स्त्रीदाक्षिण्यशून्य तरुणांच्या असभ्य वर्तणुकीपासून आपलें रक्षण करून घेतील.

तथापि प्रश्न मोठा हा आहे कीं, सुरूपशा दिसणाऱ्या मुलींना तरुण मुलें आपल्याला उपद्रव देतील अशी सतत भीति वाटावी इतके तरुणांनीं साध्या सभ्यपणापासून विन्मुख कां व्हावें? बहुसंख्य तरुणांत स्त्री-दाक्षिण्यच कमी झालें आहे असें जर दिसून आलें, तर मला दुःख

वाटेल वास्तविक आपल्या दुष्कीर्तीची सबंध तरुणवर्गालाच चाड असली पाहिजे आणि आपल्या सोबत्यांत कोणाकडून जर असें अमर्याद वर्तन घडलें, तर त्यांनीं अशा प्रत्येक गोष्टीचा समाचार घेतला पाहिजे. आपल्या आईबहिणींच्या शीलाइतकेंच प्रत्येक स्त्रीचें शील त्यांना मोलाचें वाटलें पाहिजे. ते जर सभ्यपणा शिकले नाहींत, तर त्यांना मिळत असलेलें शिक्षण व्यर्थच होईल.

आणि शिक्षकांनीं व प्रोफेसरांनींहि आपल्या विद्यार्थ्यांच्या अभ्यासाइतकेंच त्यांच्या अंगीं सभ्यपणा यावा या गोष्टीकडे लक्ष द्यावयास नको काय ?

हरिजन : ३१-१२-१९३८

---

# आधुनिक तरुणी : : ३२

अकरा मुलींनीं आपलीं नांवें आणि पत्ते देऊन मला एक पत्र लिहिलें आहे. त्या पत्राचा भावार्थ यत्किंचितहि न बदलतां तें पत्र मी खालीं देत आहें :

" ३१ डिसेंबर १९३८ च्या 'हरिजन'च्या अंकांत 'विद्यार्थ्यांना काळिमा आणणारी गोष्ट' या मथळ्याखालीं आपण आपल्याला आलेलें एका विद्यार्थिनीचें पत्र व त्याला आपलें टीकात्मक उत्तर दिलें आहे. आधुनिक तरुणीनें आपल्याला इतका संताप आणला आहे कीं आपण

तिला शेवटीं 'अर्धा डझन रोमिओंना खेळविणारी ज्युलिएट' असें संबोधून तिला निकालांत काढलीं आहे. स्त्रियांच्याविषयीं आपली सर्वसाधारणपणें काय कल्पना आहे हें या उद्गारावरून कळून येतं. ती कांहीं फारशी स्फूर्तिप्रद नाहीं.

" आज जेव्हां स्त्रिया पुरुषांना हातभार लावण्याकरितां आणि जीवनाचा अर्धा बोजा उचलण्याकरितां घराच्या चार भिंतींच्या बाहेर पडत आहेत, अशा वेळीं पुरुषांनीं त्यांना गैर रीतीनें वागविलें; तरी त्यांना (स्त्रियांना) दोष देण्यांत येतो हें खरोखर विलक्षण आहे. स्त्रीचा आणि पुरुषाचा दोघांचाहि अपराध सारखाच आहे अशीं उदाहरणें दाखवितां येतील. हें नाकबूल करण्यात अर्थ नाहीं. अर्धा डझन रोमिओंना खेळविणाऱ्या ज्युलिएटचा भाग वजावणाऱ्या कांहीं मुली नसतील असें नाहीं. पण अशा उदाहरणांवरूनच सिद्ध होतें कीं, ज्युलिएटला धुंडाळींत रस्तोरस्तीं फिरणारे अर्धा डझन रोमिओ आहेतच. आणि आधुनिक तरुणी सर्वच अगदीं ज्युलिएट आहेत किंवा आधुनिक तरुण सर्वच रोमिओ आहेत असें कांहीं समजतां येणार नाहीं किंवा कधींहि समजूं नये. आपण स्वतः कित्येक आधुनिक तरुणींच्या संबंधांत आलां असाल आणि त्यांचा निश्चय, त्याग आणि इतर शुद्ध स्त्रीत्वाचे सद्गुण पाहून आपण थक्क झालां असाल.

" आपल्याला पत्र लिहिलेल्या मुलीनें ज्या गैरवर्तणुकीचा उल्लेख केला त्यासंबंधीं लोकमत तयार करायचें झालें, तर तें मुलींनीं करावयाचें नाहीं. खोट्या लज्जेमुळें नव्हे, तर करायचा तो प्रयत्न केला तरी त्याचा कांहीं परिणाम होणार नाहीं म्हणून.

" पण एका विश्ववंद्य विभूतीच्या तोंडून अशा तऱ्हेचें विधान निघणें म्हणजे 'स्त्री हें नरकाचें द्वार आहे' या जीर्ण आणि अनुचित म्हणीची बाजू पुनः एकदां उचलून धरली गेली असें म्हणायचें, दुसरें काय?

" तथापि, वरील उद्गारांवरून असें मात्र कृपा करून समजूं नका कीं, आधुनिक तरुणींना आपल्याबद्दल आदरभाव नाहीं. तरुणांना आपल्याविषयीं जितका आदर आहे, तितकाच त्यांनाहि आहे. आपला कोणी द्वेष करावा किंवा कींव करावी याचा त्यांना फार तिटकारा आहे. त्यांचा खरोखर अपराध असेल, तर त्या आपले मार्ग सुधारण्याला तयार आहेत. त्यांना शिव्याशाप देण्यापूर्वी त्यांचा कांहीं अपराध असेल, तर तो निश्चयेंकरून सिद्ध झाला पाहिजे. या बाबतींत त्या पुरुषांच्या स्त्रीदाक्षिण्यवृत्तीच्या आड आसरा घेऊं इच्छीत नाहींत किंवा चूप राहून न्याय करणाऱ्याला हवा तसा आपला धिक्कारहि त्या करूं देणार नाहींत. सत्याला तोंड दिलेंच पाहिजे. आधुनिक तरुणींमध्यें—किंवा आपल्या भाषेंत ' ज्युलिएट ' मध्यें—तसें तोंड देण्याइतकें धैर्य आहे. "

या पत्रलेखिकांना कदाचित् माहीत नसेल कीं, हिंदुस्थानच्या स्त्रियांची सेवा मीं दक्षिण आफ्रिकेंत सरू केली, त्याला चाळिसावर वर्षें होऊन गेलीं. त्यावेळीं यांचा जन्महि झाला नसेल. स्त्रीवर्गाला कमीपणा आणण्याजोगें कांहींहि लिहिण्याची कुवतच माझ्यांत नाहीं असें मी मानतों. स्त्रियांच्याविषयीं माझा आदरभाव इतका मोठा आहे कीं, तो मला त्यांच्याविषयीं वाईट विचार करूंच देणार नाहीं. इंग्रेजी भाषेंत स्त्रीला मनुष्य जातीचा ' बेटर हाफ् ' म्हणजे पुरुषाहून उच्चतर असा अर्धा भाग म्हटलें आहे. माझा तो लेख विद्यार्थ्यांचा काळिमा उघड करण्याकरितां लिहिला होता, मुलींची दुर्बलता चव्हाटयावर मांडण्याकरितां नाहीं. पण रोगाचें निदान काय आहे, हें सांगतांना त्याच्यासाठीं जर बिनचूक उपाय सुचवावयाचा असेल, तर रोग निर्माण कोणत्या कारणांनीं झाला तें नमूद करण्यावांचून मला गत्यंतर नव्हतें.

' आधुनिक तरुणी ' या शब्दांना विशिष्ट अर्थ आहे. त्यामुळें माझ्या उद्गारांची व्याप्ति कांहींजणींपुरतीच मर्यादित करण्याचा प्रश्नच

उद्भवत नव्हता. पण इंग्रजी शिक्षण घेणाऱ्या सर्वच मुली कांहीं 'आधुनिक' तरुणी नाहींत. 'आधुनिक तरुणी' वृत्तीचा ज्यांना स्पर्शहि नाहीं, अशा पुष्कळ मुलींना मी ओळखतों. पण कांहीं मात्र तशा बनल्या आहेत खऱ्या. 'आधुनिक तरुणी'ची नक्कल करूं नका आणि अगोदरच ज्याच्यापासून मोठें भय उत्पन्न झालें आहे, अशा प्रश्नांत आणखी गुंतागुंत करू नका एवढा इषारा देण्याचाच माझा त्या उद्गारांचा हेतु होता. कारण, मागील लेखामध्यें उल्लेख केलेलें पत्र जेव्हां मला मिळालें, त्याच वेळीं एका आंध्र विद्यार्थिनीकडूनहि एक पत्र मला आलें. त्यांत आंध्र विद्यार्थ्यांच्या वर्तनाबद्दल कडक तक्रार होती. तिनं जें वर्णन दिलें आहे, तें लाहोर तरुणीनें केलेल्या वर्णनाहून कितीतरी वाईट आहे. ही आंध्र कन्यका म्हणते कीं, माझ्या तरुण मैत्रिणींचें साध्या पोशाखानें रक्षण होत नाहीं, पण तरुणांचा जंगलीपणा उघड करून सांगण्याचें धैर्य त्यांच्यांत नाहीं. ज्या संस्थेचे असे विद्यार्थी असतील, त्या संस्थेला ते कलंकभूत आहेत. आंध्र युनिव्हर्सिटीच्या अधिकारी व्यक्तींनीं या तक्रारीकडे लक्ष द्यावें. या अकरा मुलींनीं मुलांच्या असभ्य वर्तनाविरुद्ध धर्मयुद्ध सुरू करावें, असें माझें त्यांना सांगणें आहे. जे स्वावलंबी आहेत, त्यांनाच ईश्वराचें साह्य होतें. पुरुषाच्या गुंडगिरीच्या वर्तणुकी-पासून आपला बचाव करण्याची कला मुलींनीं शिकली पाहिजे.

हरिजन : ४-२-१९३९

---

## कामशास्त्राचें शिक्षण : : ३३

मगनभाई देसाई हे गुजरात विद्यापीठाचे एम्. ए. आहेत. त्यांनीं मला जें पत्र लिहिलें आहे, त्यांतील उतारा खालीं उद्धृत केला आहे:

"'हरिजन-बंधु' मध्यें आजपर्यंत ज्या एका विषयाला जवळजवळ स्पर्श केला नाहीं, त्या विषयाची आपण चर्चा करावी अशी माझी विनंति आहे. तो विषय म्हणजे मुलांना कामविषयाचें शिक्षण द्यावें कीं नाहीं हा. आपल्याला माहीत आहे कीं श्री...हे गुजरातेंत या विषयाचे मोठे पुरस्कर्ते मानले जातात. मला स्वतःला या बाबतींत नेहमीं शंकाच वाटत आली आहे. पण ही शंका सोडून दिली, तरी हे गृहस्थ या कामाला लायक आहेत असें मला वाटत नाहीं. निदान परिणाम तरी उत्तेजन देणारे खास नाहींत. या गृहस्थांच्या मताप्रमाणें आमच्या सर्व शिक्षण-विषयक प्रश्नांच्या आणि सामाजिक व्याधींच्या बुडाशीं कामशिक्षणाचा अभाव आहे. सर्व मानवी हालचालींचें उगमस्थान मनुष्याच्या मनांत सुप्तावस्थेंत असलेली मैथुनेच्छा ही आहे, असें शिकविणाऱ्या आधुनिक मानसशास्त्रावर सदर गृहस्थ आणि त्यांच्या विचाराचे लोक अधाशीपणें अगदीं तुटून पडतात, आणि त्या बाबतींत अधिक खोलांत न जातां या तत्त्वज्ञानाला उचलून डोक्यावर घेतात, त्याला देवस्वरूप मानतात. आपल्या आश्रमांतला तो खाडकर मुलगा परवां माझ्याजवळ म्हणाला, 'प्रत्येक माणसाच्या अंतःकरणांत असलेल्या कामदैत्याची तुम्हांला काय माहिती आहे?' त्याच्या या उद्गारांनीं त्याच्यांतील नैतिक जाणीव जागृत आहे असें व्यक्त झालें नाहीं, तर ही जाणीव बोथट झाल्याचेंच मला दिसलें. काम-शिक्षणाच्या नांवाच्या आड लपून जो खोडसाळपणा

आज केला जात आहे त्याला अंत नाहीं. या विषयावर पुस्तकें लिहिलीं जात आहेत, त्यांच्या लागोपाठ आवृत्त्यांवर आवृत्त्या निघत आहेत, आणि प्रत्येक आवृत्ति हजारोंनीं निघत आहे. कांहीं साप्ताहिकें तर या विषयाचा अगदीं किफायतशीर रीतीनें उपयोग करून घेऊनच जगत आहेत. त्यांचा भयंकर खप आहे. याचा परिणाम किती भयंकर होत असेल त्याची कल्पना करतां यईल. अर्थात् कोणी म्हणतील कीं, समाजाची जशी योग्यता आणि गरज तसेंच त्याला मिळणार. पण असें म्हणून समाज-सुधारकाला कसें समाधान मिळणार ? कामशास्त्राच्या नांवाखालीं चोरून-मारून आज जें मैथुनविषयक साहित्याचें भरताड निपजतें आहे, त्याच्या योगानें सुधारकाचें काम अत्यंत बिकट होत आहे.

" म्हणून सार्वजनिक रीत्या आपण या विषयाची चर्चा करावी, अशी माझी विनंती आहे. आमच्या मुलांच्या शैक्षणिक अभ्यासक्रमांत काम-विषयक शिक्षणाचा अंतर्भाव करावा काय ? तें कोणी द्यावें ? हें काम करण्यासाठीं आवश्यक लायकी काय असावी ? भूगोल—गणिता-प्रमाणेंच सरसकट सर्वांना हा विषय अगदीं उघड उघड आहे तसा शिकवावा काय ? कीं त्याला कांहीं मर्यादा आहे ? अशी मर्यादा कोणी आणि कोठपर्यंत घालावी ? पुनः कामशिक्षणाचा उद्देश कामेच्छेच्या आक्रमणाला तोंड देणें हा असावा, कीं ती एक नैसर्गिक वस्तुस्थिति आहे, ती टाळतां येणार नाहीं, तिला मान्यता देऊन तिच्यापुढें मान तुकविली पाहिजे असें मुलांपुढें मांडावें ? "

कामविषयक गुंतागुंतीचे प्रश्न हिंदुस्थानांत आतां हळुहळू मूळ धरूं लागले आहेत. आणि विशेष म्हणजे, त्याच्या पकडींत जे आले आहेत त्यांना आपण कांहीं पुण्यकृत्यच जणुं करतों आहों असें वाटतें. गुला-माला जेव्हां आपल्या बेड्यांविषयीं अभिमान वाटूं लागतो आणि बहु-मोल दागिने म्हणून त्यांना तो जेव्हां आपल्या उराशीं कवटाळूं लागतो,

तेव्हां समजावें कीं त्याला गुलाम करणाऱ्या धन्याचा पुरा विजय झाला. पण मदनाचा हा विजय जरी डोळे दिपविण्याजोगा वाटला, तरी तो अल्पजीवी आणि टाकाऊ ठरेल, आणि शेवटीं तो विष संपलेल्या विंचवाच्या नांगीप्रमाणें शून्यवत् होऊन जाईल, अशी माझी खात्री आहे. पण दरम्यानच्या काळांत आपण हात जोडून स्वस्थ बसावें असा त्याचा अर्थ नाहीं. त्याचा पराभव होणारच अशी खात्री बाळगून आपण सुरक्षित आहोंत अशा भावनेनें गाफील राहतां कामा नये. काम-जय हा स्त्रीच्या किंवा पुरुषाच्या आयुष्यांतील महान् पुरुषार्थ आहे. काम-विकारावर जय मिळविल्यावाचून मनुष्य स्वतःवर ताबा चालवूं शकत नाहीं; आणि स्वतःवर ताबा नसेल तर 'स्वराज्य' कसलें, रामराज्य कसलें? स्वतःवर ताबा नसतांना जगावर ताबा ठेवणें हें खेळांतल्या रंगीत आंब्यासारखेंच फसवें आणि निराशाजनक आहे. तो आंबा बाहेरून दिसतो सुंदर, पण आंत असतो पोकळ आणि रिकामा! आसक्तीवर ज्यानें विजय मिळविला नाहीं, असा कोणताहि कार्यकर्ता हरिजनसेवा, जातीय ऐक्य, खादी, गोसेवा किंवा ग्रामसेवा यांपैकीं एकाहि कार्याची खरी सेवा करील, अशी आशा बाळगतां येणार नाहीं. केवळ बुद्धिमत्तेच्या जोरावर अशीं महान् कार्यें होत नसतात, त्यांना आध्यात्मिक प्रयत्नाची किंवा आत्मबळाची गरज असते. आत्मबल हें नारायणाची कृपा झाली तरच प्राप्त होतें, आणि नारायणाची कृपा इंद्रियांचा जो गुलाम झाला त्याच्यावर कधींहि होत नाहीं.

तर मग, आमच्या शिक्षणपद्धतींत कामशास्त्राच्या शिक्षणाला स्थान आहे कीं नाहीं, व असलें तर कोणतें? कामशास्त्र हें दोन प्रकारचें आहे. कामविकारावर ताबा ठेवण्याकडे किंवा त्याला जिंकण्याकडे ज्याचा उपयोग होतो तें, आणि विकाराला पोषण देऊन त्याची वाढ करण्याकडे उपयोग होतो तें. पहिल्या प्रकारच्या शास्त्राचें शिक्षण मुलाला अवश्य दिलें पाहिजे. दुसऱ्या प्रकारचें शिक्षण अपकारक, घातुक आहे;

आणि म्हणून देतां कामा नये. सर्व धर्मांमध्यें ' काम ' हा मनुष्याचा कट्टा वैरी मानला आहे आणि तें बरोबर आहे. क्रोध किंवा द्वेष याला दुसरें स्थान दिलें आहे. गीतेंत क्रोध हा कामाची संतति मानली आहे. अर्थात् गीता ' काम ' हा शब्द ' वासना ' या व्यापक अर्थी वापरते. पण या ठिकाणीं ज्या संकुचित अर्थानें तो वापरला आहे त्या अर्थानेंहि गीतेचें म्हणणें खरें आहे.

पण हें झालें तरी लहान विद्यार्थ्यांना जननेंद्रियांचा उपयोग व कार्य याविषयीं माहिती देणें इष्ट कीं अनिष्ट हा प्रश्न अनुत्तरितच राहातो. मला वाटतें कीं अशा तऱ्हेचें ज्ञान कांहीं प्रमाणापर्यंत देणें अवश्य आहे. आज हें ज्ञान मुलें पुष्कळ वेळां वाटेल त्या मार्गांनीं करून घेण्याचा प्रयत्न करतात, त्याच्याकडे कोणी लक्ष देत नाहीं. याचा परिणाम असा होतो कीं, त्यांना दुष्ट संवयी लागतात. कामविकाराकडे डोळेझांक करून कांहीं आपल्याला तो योग्य रीतीनें ताब्यांत ठेवतां किंवा जिंकतां येणार नाहीं; म्हणून तरुण मुलांमुलींना जननेंद्रियाचें महत्त्व व सदुपयोग काय आहे तें शिकविलें पाहिजे या मताचा मी कट्टा पुरस्कर्ता आहें. आणि मीं माझ्या ताब्यांत असलेल्या मुलांमुलींना हें ज्ञान देण्याचा माझ्या मार्गानें प्रयत्न केला आहे.

मी ज्या लैंगिक शिक्षणाचा पाठिंबा आहे, त्या शिक्षणाचा हेतु कामविकारावर जय मिळवून त्याला उदात्त बनविणें हा आहे. या शिक्षणानें मुलांना आपोआपच मनुष्य आणि पशु यांच्यामधील महत्त्वाचा भेद समजला पाहिजे. बुद्धीच्या आणि हृदयाच्या अशा दोन्ही शक्तींचा लाभ होणें हा मनुष्याचाच विशेष हक्क आहे आणि ती त्याला अभिमानाची गोष्ट आहे. ' मनुष्य ' या शब्दाची व्युत्पत्तीच दाखवितें कीं तो जितका बुद्धियुक्त तितकाच भावनायुक्त प्राणी आहे. म्हणून आपल्या

अंध विकाराकरितां बुद्धीचें सार्वभौमत्व सोडून देणें म्हणजे मनुष्यत्वाचें सर्वस्वच सोडून देणें आहे, या गोष्टी मुलांना या शिक्षणानें जाणवून दिल्या पाहिजेत. मनुष्यप्राण्यांत बुद्धि ही लगेच स्फुरण पावते व भावनेचें मार्गदर्शन करते; पशूंमध्यें हें चैतन्य नेहमीं सुप्त असतें. हृदयाला जागें करणें म्हणजे या सुप्त आत्मतत्त्वाला जागृत करणें, बुद्धीला जागृत करणें, आणि सत्-असत् यांमधील भेद् विंबवून घेणें होय.

हें खरें कामशास्त्र शिकविण्याला लायक कोण आहे ? अर्थातच ज्यानें आपल्या भोगलालसेवर प्रभुत्व मिळविलें आहे तो. ज्योतिर्विद्या आणि असेच इतर विज्ञान-विषय शिकविण्याला त्या त्या विषयांच्या अभ्यासक्रमांत तयार होऊन जे बाहेर पडले आहेत आणि ज्यांनीं त्या विषयावर प्रभुत्व मिळविलें आहे असेच शिक्षक आपण घेतों कीं नाहीं ? त्याचप्रमाणें कामशास्त्र म्हणजे काम–विजयाचें शास्त्र शिकविण्याकरितां असेच शिक्षक आपण घेऊं, कीं ज्यांनीं त्याचा पुरा अभ्यास केला आहे आणि स्वतःवर प्रभुत्व मिळविलें आहे. ज्यामध्यें कळकळ व अनुभव नाहीं असे बोल कितीहि उच्च असले, तरी ते जड व चेतनहीन होतील आणि मनुष्याच्या हृदयांत शिरून त्याला जागृत करण्याला असमर्थ ठरतील. पण तेच बोल जर आत्मसाक्षात्काराच्या आणि खऱ्याखुऱ्या अनुभवाच्या जोरावर निघालेले असतील, तर त्यांचा परिणाम झाल्यावांचून खचित राहाणार नाहीं.

आज आमच्याभोंवतालची सर्व परिस्थिति आमचें वाचन, आमचें चिंतन, आमचा सामाजिक आचार बहुधा कामविकाराचें पोषण करण्याच्याच कामीं येत आहे. या परिस्थितीच्या विळख्यांतून मुक्तता करून घेणें हें कांहीं लहानसहान काम नव्हे. आमच्या परमोच्च पुरुषार्थाला साजेल असेंच तें काम आहे. संयमाचा आदर्श मनुष्यमात्राचें सर्वोच्च कर्तव्य म्हणून ज्यांनीं स्वीकारला, आपल्या जीवित-कार्यावरील

खऱ्याखुऱ्या अमर श्रद्धेनें ज्यांच्यांत जोम उत्पन्न केला आहे, आणि जे अतंद्रितपणें जागरूक व तत्पर आहेत असे मूठभर जरी शिक्षक असले, तरी ते आपल्या श्रमानें हिंदुस्थानांतील लहान बालकांचा जीवन-पथ उज्ज्वल करतील, बेसावध असतील त्यांना कामविकाराच्या गर्तेत पडण्यापासून वांचवितील, आणि जे अगोदरच त्यांत आकंठ रुतले आहेत त्यांना त्यांतून सोडवितील.

हरिजन : २१-११-१९३६

---

## अयोग्य नारीपूजन : : ३४

गुजरात–साहित्य–परिषदेच्या नोव्हेंबर १९३६ च्या अधिवेशनांत गांधीजींनीं विषय–नियामक समितीपुढील आपल्या भाषणांत ज्या एका विषयाचा उल्लेख केला, तो विषय 'ज्योतिसंघ' नांवाच्या गुजरातेंतील एका स्त्री–संस्थेंतील कांहीं सन्मान्य महिलांनीं गांधीजींना एक पत्र पाठविलें होतें त्यामधून त्यांना मिळाला. त्या पत्राबरोबरच संघानें पास केलेला एक महत्त्वाचा ठरावहि त्या महिलांनीं पाठविला होता. आजकाल वाङ्मयांतून स्त्रियांना ज्या तऱ्हेनें रंगविण्याची प्रवृत्ति सुरू झाली आहे, त्या प्रवृत्तीचा त्या ठरावांत धिक्कार केला होता. त्यांच्या या निषेधांत गांधीजींना बरेंच तथ्य वाटलें. ते म्हणाले :

"या महिलांनीं जो आरोप केला आहे त्या आरोपांतील सार हें आहे कीं, आजकालचे लेखक स्त्रियांचें अत्यंत खोटें चित्र रेखाटींत

असतात. तुम्ही लेखक लोक ज्या किळसवाण्या भावनावशतेनें त्यांना रंगवितां, ज्या हीन रीतीनें तुम्ही त्यांच्या शरीराकृतींचें पाल्हाळिक वर्णन करीत बसतां, तिचा त्यांना संताप येतो. त्यांच्या शरीराच्या बाह्य रूपांत, पुरुषांच्या कामुक दृष्टीला तृप्त करण्याच्या त्यांच्या कुवतींत कां त्यांचें सारें सौंदर्य, त्यांचें सारें बळ आहे ? 'स्त्रिया म्हणजे गरीब, नित्य ताबेदारींत राहाणाऱ्या घरच्या मोलकरणी, नवरा हेंच त्यांचें दैवत, असेंच आमचें वर्णन जगाच्या अंतापर्यंत कां केलें जावें ?' अशी या पत्रलेखिकांची न्याय्य पृच्छा आहे. त्या जशा आहेत तसेंच त्यांना कां रेखाटूं नये ? त्या म्हणतात कीं 'आम्ही स्वर्गांगनाहि नाहीं, बाहुल्याहि नाहीं, किंवा केवळ विकारांचीं आणि भावनांचीं भेंडोळींहि नाहीं. पुरुष ज्या प्रकारचे मानवी प्राणी आहेत, तशाच आम्हीसुद्धां मानवी प्राणीच आहोंत आणि त्यांना जशी स्वतंत्र होण्याची तळमळ असते तशीच आम्हांलाहि असते.' स्त्रियांना आणि त्यांच्या भावनांना मी बरेंच जाणतों. दक्षिण आफ्रिकेंत असतांना अशी एक वेळ आली होती, कीं जेव्हां अनेक स्त्रियांमध्येंच माझें वास्तव्य होतें; कारण त्यांचे नवरे तुरुंगांत गेले होते. त्या अदमासें साठ एक स्त्रिया होत्या आणि त्या सर्व मुलींचा आणि बायकांचा मी बाप बनलों होतों, भाऊ बनलों होतों. मी खात्रीपूर्वक तुम्हांला सांगूं इच्छितों कीं, माझ्या पांखराखालीं त्यांचें शरीरबल आणि आत्मबल दोन्ही वाढलीं; इतकीं कीं त्या आपण होऊन शेवटीं तुरुंगाकडे धांवल्या.

मला असें सांगण्यांत आलें कीं, आमचें वाङ्मय स्त्रियांविषयींच्या फाजिल पूजक वृत्तीनेंसुद्धां भरलेलें असतें. ही नारीपूजा सर्वथैव चुकीची आहे हें मी सांगूं इच्छितों. तुमच्यापुढें मी एक साधी कसोटी ठेवतों. तुम्ही त्यांच्याविषयीं लिहूं लागतां, तेव्हां त्यांच्याकडे पहाण्याची तुमची दृष्टि कोणती असते ? माझी अशी सूचना आहे कीं, कागदाला

लेखणी लावण्यापूर्वी स्त्री ही आपली आइ आहे अशी कल्पना करा; कीं मग खालीं कोरड्या पडलेल्या पृथ्वीवर आकाशांतून जशी सुंदर पर्जन्य-वृष्टि व्हावी, तसा तुमच्या लेखणींतून पवित्रतम साहित्याचा स्रोत वाहूं लागेल, अशी मी खात्री देतों. स्त्री ही तुमची पत्नी होण्यापूर्वी तुमची आई होती हें ध्यानीं आणा. कांहीं लेखक त्यांची आध्यात्मिक तृषा शांत करण्याचें दूरच राहिलें, पण त्यांच्या विकारांनाच उत्तेजित करतात; इतकें कीं बिचाऱ्या अज्ञानी बायकांना कादंबरींत वर्णन केल्याप्रमाणें तंतोतंत आपला आचार कसा बरें ठेवावा याचा विचार पडतो आणि त्यांतच त्या आपला वेळ गमावितात! स्त्रियांच्या अवयवांचें अगदीं बारिकसारीक वर्णन हें साहित्याचें आवश्यक अंग असलेंच पाहिजे काय? उपनिषदांत, कुराणांत किंवा बायबलमध्यें तसें कांहीं तुम्हांला कधीं आढळलें आहे काय? आणि तरीसुद्धां बायबलावांचून इंग्रजी भाषा शून्यवत् होईल हें तुम्हांला माहीत आहे? तीन चतुर्थांश बायबल आणि एक चतुर्थांश शेक्सपिअर, असें इंग्रजी वाङ्मयाचें वर्णन आहे. कुराण नसतें तर अरबी भाषेची आठवणाहि कुणाला राहिली नसती. आणि तुलसीदास नाहीं अशा हिंदीची कल्पना करा! आजच्या वाङ्मयांत स्त्रियांविषयीं जें दिसून येतें तें त्यांत तुम्हांला दिसतें काय?"

हरिजन : २१-११-१९३६

एका आक्षेपार्ह पुस्तकाची जाहिरात असलेल्या एका सुप्रसिद्ध मासिकांतील कांहीं भाग एका भगिनीनें कापून पाठविला आहे. ती लिहिते :

" ...... मासिकाचा पानें चाळीत असतांना सोबत पाठविलेला भाग माझ्या पाहाण्यांत आला. आपल्याकडे हें मासिक येतें कीं नाहीं, मला माहीत नाहीं. आपल्याकडे तें पाठावलें तरी तें चाळण्याइतकी सुद्धां फुरसत आपल्याला कधीं मिळत असेल असें मला वाटत नाहीं. पूर्वीं एकदां मी आपल्याला 'अश्लील जाहिराती 'संबंधीं बोलले होतें. केव्हा तरी एकदां आपण त्यासंबंधीं लिहावें अशी मला किती इच्छा आहे म्हणून सांगूं! वरीलप्रमाणें जाहिरात केल्या गेलेल्या पुस्तकांसारख्या पुस्तकांनीं आज बाजार भरून टाकला आहे हें नितांत सत्य आहे. पण म्हणून काय ...... सारख्या मासिकांनीं त्यांच्या विक्रीला उत्तजन द्यावें ? अशा गोष्टींनीं माझ्या स्त्री–शालीनतेला इतका भयंकर धक्का बसत आहे, कीं आपल्यावांचून दुसऱ्या कोणालाहि मी यासंबंधीं लिहूं शकत नाहीं. ईश्वरानें स्त्रीला हेतुपूर्वक एका स्पष्ट कार्यासाठीं जें दिलें आहे त्याची विपरीत उपयोगासाठीं जाहिरात व्हावी हें किती नीचपणाचें आहे तें शब्दांनीं सांगतां येत नाहीं...या बाबतींत प्रमुख वृत्तपत्रांची व नियतकालिकांची जबाबदारी काय आहे तें आपण लिहावें अशी माझी इच्छा आहे. आपल्या टीकेकरितां एवढेंच एक मला पाठवितां आलें असतें असें मात्र मुळींच नाहीं."

वर उल्लिखिलेल्या जाहिरातींतून मी कोणताहि भाग उध्दृत करूं इच्छित नाहीं. वाचकांना फक्त एवढेंच सांगतों, कीं ज्या पुस्तकांचीं

जाहिरात केली आहे, त्यांतील सूचक मजकूर शक्य तितक्या अश्लीलपणें त्यांत वर्णन केलेला आहे. जाहिरातीचा मथळा आहे 'स्त्री शरीराचें लैंगिक सौंदर्य', आणि जाहिरात देणारी फर्म वाचकाला सांगतें कीं, हें पुस्तक विकत घेणाऱ्याला 'वधूला नवज्ञान' आणि 'कामप्रेरित आलिंगन किंवा आपल्या जोडीदाराला कसें खूष कराल' या नांवाचीं दोन पुस्तकें फुकट दिलीं जातील.

असल्या पुस्तकांची जाहिरात देणारांना मी थांबवूं शकेन किंवा संपादकांना अथवा प्रकाशकांना नफा उकळण्याच्या कामापासून परावृत्त करूं शकेन असें जर या भगिनीला वाटत असेल, तर ती तिची चुकीची समजूत आहे. आक्षेपार्ह पुस्तकें किंवा त्यांच्या जाहिराती प्रसिद्ध करूं नका म्हणून मी कितीहि विनवणी केली, तरी तिचा कांहीं उपयोग होणार नाहीं. पण मला पत्र लिहिणाऱ्या भगिनीला आणि तिच्याच-साख्या इतर स्त्रियांना मात्र मी सांगूं इच्छितों कीं, त्यांनीं बाहेरच्या क्षेत्रांत मोकळेपणीं पाऊल टाकावें आणि हें काम हातीं घ्यावें. हें सर्वस्वीं त्यांचेंच काम आहे. पुष्कळ वेळां असें होतें कीं, एकाद्याला 'तूं असाच आहेस किंवा अशीच आहेस' म्हणून लोक नांवें ठेवतात आणि मग कांहीं काळानंतर त्या माणसाला आपण तसेंच आहों असें वाटायला लागतें. स्त्रीला 'अबला' म्हणणें म्हणजे तिची बदनामी करण आहे. स्त्री अबला कशी, मला कळत नाहीं. त्याचा अर्थ तिच्यांत पुरुषाच किंवा पुरुषाइतकें पाशवी बळ नाहीं असा असेल, तर तो आरोप मात्र कबूल करायला हरकत नाहीं. पण मग स्त्रीजाति पुरुषांपेक्षां अधिक थोर ठरते, आणि ती तशी आहेहि. ठोसा लगावण्यांत ती जरी दुबळी असली, तरी सहनशीलतेंत ती शक्तिमती आहे. त्यागाची आणि अहिंसेची मूर्ति म्हणून मी स्त्रीचें वर्णन करितों. आपलें शील किंवा आपली अब्रू बचाविण्याकरितां आपण पुरुषावर अवलंबून राहूं नये हें तिनें शिकलें पाहिजे. स्त्रीच्या शीलाचें पुरुषानें कधीं काळीं रक्षण केल्याचें एकहि

उदाहरण मला ठाऊक नाहीं. सीतेचें शील कांहीं रामानें किंवा द्रौपदीचें पांडवांनीं राखलें नाहीं. केवळ आपल्या पावित्र्याच्या जोरावर त्या दोघींनींहि आपल्या शीलाचें रक्षण केलें. कोणाच्याहि अब्रूला किंवा स्वाभिमानाला त्या माणसाच्या संमतीवांचून कोणीहि धक्का लावूं शकत नाहीं. एकाद्या दुष्ट स्त्रीनें एकाद्या पुरुषाला मादक औषध देऊन आपल्या इच्छेप्रमाणें त्याला वागायला लावण्यांत त्या पुरुषाची अब्रू किंवा शील जसें नाहींसें होत नाहीं, त्याचप्रमाणें एकाद्या नरपशूनें एकाद्या स्त्रीला बेशुद्ध पाडून तिच्यावर बलात्कार केला तरी तिची अब्रू किंवा शील मुळींच नाहींसें होत नाहीं.

पुरुषाच्या सौंदर्याचीं स्तुतिस्तोत्रें गाणारीं पुस्तकें लिहिलीं गेलेलीं नाहींत हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. पण पुरुषाचे पाशवी विकार जागृत करण्याजोगें साहित्य मात्र नेहमीं निघावें हें कां ? पुरुषानें स्त्रीला ज्या पदव्या बहाल केल्या आहेत, त्याबरहुकूम राहाणें स्त्रीला आवडतें असें तर नसेल ? आपल्या शरीरसौंदर्याचा पुरुषानें स्वतःसाठीं वाटेल तसा उपयोग करून घ्यावा हें स्त्रीला आवडत असेल काय ? पुरुषापुढें आपलें शरीर सुंदर दिसावें अशी तिची आवड असते असते काय ? आणि ती कां ? शिक्षित स्त्रियांनीं स्वतःला हे प्रश्न विचारावेत. या जाहिरातीमुळें आणि साहित्यामुळें जर त्यांचीं अंतःकरणें दुखावत असतील, तर त्यांनीं त्याच्याशीं कठोरपणें झगडा सुरू केला पाहिजे; कीं तावडतोब हे प्रकार थांबतील. आपल्यांत वाईट करण्याची जशी सुप्त शक्ति आहे, तशीच चांगलें करण्याचीहि शक्ति सुप्त आहे हें स्त्रीनें ओळखावें. स्वतःला किंवा आपल्या जोडीदाराला—मग तो बाप असो, मुलगा असो, वा पति असो—जगांत अधिक चांगल्या रीतीनें जगतां यावें अशी परिस्थिति जगांत निर्माण करण्याची तिच्यांत ताकद आहे; मात्र तिनें स्वतःला अबला समजून आपण फक्त पुरुषाच्या क्रीडेचें साधन आहोंत असें मानणाचें

सोडून दिलें पाहिजे. राष्ट्राराष्ट्रांमधील अविचारी युद्धांनीं किंवा त्याहूनहि अविचारी अशा समाजाच्या नैतिक पायाविषयींच्या लढायांनीं जर समाजाला नष्ट करावयाचें नसेल, तर स्त्रीला आपली कामगिरी बजावावी लागेल. कांहीं स्त्रिया जशा मर्दानी पद्धतीनें ती बजाविण्याचा प्रयत्न करीत आहेत तशा प्रकारें नव्हे; तर स्त्रीच्या मार्दवाला अनुसरून. जीवनाचा बहुंशीं विनाहेतु नाश करण्याच्या पुरुषाच्या शक्तीशीं स्पर्धा करून कांहीं ती मानवजातीला अधिक सुखी करणार नाहीं. प्रमादी पुरुषाला त्याच्या चुकीपासून परावृत्त करणें हा स्त्रीचा हक्क आहे, तो तिनें गाजवावा. या चुकीमुळें ओढवणाऱ्या त्याच्या विनाशांत तिचाहि विनाश आहे. ही गलिच्छ जाहिरात फक्त वारा कोणत्या दिशेनें वाहात आहे, तें दाखविणाऱ्या काडीसारखी आहे. स्त्रीचा हा निर्लज्जपणें फायदा घेणें आहे.

हरिजन : १४-११-१९३६

---

## अश्लील जाहिराती कशा थांबवाव्यात? : ३६

'अश्लील जाहिराती'वरील माझा लेख वाचून एक पत्रलेखक लिहितो :

"आपण निर्देश केल्या तशा निर्लज्ज गोष्टींची जाहिरात करणाऱ्या वृत्तपत्रांचीं व मासिकांचीं नांवें जर आपण जाहीर केलींत, तर अशा अश्लील जाहिरातींना आपण बराचसा पायबंद घालूं शकाल."

पत्रलेखक सुचवितो तसें नियंत्रण करण्याचें मी पत्करूं शकणार नाहीं. पण मी दुसरा चांगला मार्ग सुचवूं शकेन. लोकांची विवेकबुद्धि जर जागृत असेल, तर वर्गणीदारांनीं आपापल्या पत्रांना लिहून कळवावें कीं, अशा अशा अश्लील जाहिराती तुमच्या पत्रांत आल्या आहेत. ही चीड आणणारी गोष्ट जर तुम्हीं सुधारली नाहींत, तर आम्ही आपली वर्गणी बंद करूं. वाचकांना हें समजून बरें वाटेल, कीं ज्या भगिनीनें अश्लील जाहिरातीविषयीं माझ्याकडे तक्रार केली होती, तिनें या दोषी मासिकाच्या संपादकालाहि तसें लिहून कळविलें. संपादकानें ती अनिष्ट जाहिरात चुकून दिली गेली याबद्दल दिलगिरी व्यक्त केली, व ती तावडतोब काढून टाकण्याचें आश्वासन दिलें.

हरिजन ; २–१–१९३७

---

## आमचें प्रकाशन

* १, २ सत्याचे प्रयोग ( खंड १ तृतीयावृत्ति, खंड २ द्वितीयावृत्ति ) लेखक : म. गांधी — २–८–०
* ३ खादी–मीमांसा ( सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ति ) लेखक : वालुभाई मेहता — २–०–०
४ स्वराज्य–शिष्टाई : म. गांधी ( शिल्लक नाहीं ) — ०–६–०
५ संयम कीं स्वैराचार? ( खंड १ला ) : म. गांधी ( शिल्लक नाहीं ) — ०–८–०
६ हिंडलग्याचा प्रसाद : ( शिल्लक नाहीं ) लेखक : काका कालेलकर — ०–९–०
* ७ हिंदुधर्माचीं मूलतत्त्वें व पुनर्घटना : लेखक : एस्. राधाकृष्णन् — १–४–०
* ८ उपनिषदांतील दहा गोष्टी ( तृतीयावृत्ति ) लेखक : शंकरराव देव — ०–१२–०
* ९ विद्यार्थी–जीवन ( द्वितीयावृत्ति ) : लेखक : श्री. स. महाजन — ०–८–०
* १० फिलिफाइन्सच्या स्वातंत्र्याचा इतिहास : लेखक : त्र्यं. र. देवगिरीकर — १–४–०
११ कॉंग्रेसचा इतिहास ( द्वितीयावृत्ति ) : लेखक : डॉ. पट्टाभि सीतारामय्या — २–८–०
१२ समाजवादच कां ? ( द्वितीयावृत्ति ) : लेखक : जयप्रकाश नारायण — २–०–०
१३ खानबंधूंचा अल्प परिचय : लेखक : महादेवभाई देसाई — ०–९–०
१४ जवाहरलाल नेहरू ( आत्मचरित्र ) अनुवादक : ना. ग. गोरे ( शिल्लक नाहीं ) — ५–०–०
* १५ विश्राम ( तृतीयावृत्ति ) : साने गुरुजी — १–०–०
* १६ भारतीय संस्कृति ( तृतीयावृत्ति ) : साने गुरुजी — ३–०–०
१७ प्रसाद–दीक्षा : म. गांधी — १–०–०

१८ भिल्ल साधु गुलामहाराज :
लेखक : शं. वि. ठकार ( शिल्लक नाहीं ) ०—६—०

* १९ आधुनिक भारत : आचार्य शं. द. जावडेकर ५—०—०

* २० हिमालयांतील प्रवास ( द्वितीयावृत्ति ) :
लेखक : काका कालेलकर १-१२ ०

२१ गांधीजींचें विविध दर्शन ( द्वितीयावृत्ति ) :
संकलनकार : एस्. राधाकृष्णन् २—८—०

* २२ जिवंत व्रतोत्सव : काका कालेलकर १-१२-०

२३ गांधीविचारदोहन : किशोरलाल मश्रुवाला १—४—०

२४ सत्याग्रही महाराष्ट्र : प्रेमा कंटक ३—०—०

* २५ अर्थशास्त्र कीं अनर्थशास्त्र ? ( द्वितीयावृत्ति ) :
लेखक : जॉन रस्किन, अनुवादक : आचार्य जावडेकर २—०—०

* २६ जीवन—दर्शन ( द्वितीयावृत्ति ) : महाकवि खलिल जिब्रान
अनुवादक : र. ग. जोशी २—०—०

२७ ग्रामोद्योगाचें अर्थशास्त्र : जगदीशचंद्र कुमारअप्पा
अनुवादक : बाळुभाई मेहता १—४—०

२८ बापू : घनश्यामदास बिडला १—८—०

२९ संस्कृतीचें भवितव्य : एस्. राधाकृष्णन्
अनुवादक : साने गुरुजी १—०—०

३० महात्मा गौतम बुद्ध : एस्. राधाकृष्णन्
अनुवादक : साने गुरुजी १—०—०

३१ जीवन आणि साहित्य : आचार्य स. ज. भागवत २—८—०

३२ प्राचीन साहित्य : कविसम्राट् रवीन्द्रनाथ ठाकुर
अनुवादक : प्रो. रा. ब. आठवले १—८—०

३३ संयम कीं स्वैराचार ? ( खंड २ रा ) : म. गांधी १-१२-०

---

* हीं पुस्तकें मुंबई, मध्यप्रांत व वऱ्हाड यांतील सरकारी विद्याखात्यांनीं शाळांतील वाचनालयांकरितां व बक्षिसांकरितां मंजूर केलीं आहेत.

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला : : १२ टिळक रोड, पुणें २